# सासुरवास

[ गद्यपद्यात्मक दोन अंकी कौटुंबिक नाटिका ]

माताभुमिः पुत्रोऽहं पृथिव्याः।” अथर्ववेद। २-१

“नमो मात्रे पृथिव्यै।नमो मात्रे पृथिव्यै!।” यजु० ९-२२

: लेखक :

कै. गणेशशास्त्री कृष्णशास्त्री फाटक

प्रकाशक

बलवन्त पुस्तक भाण्डार

गिरगांव नाका, मुंबई नं. ४.



बलवन्त
प्रकाशन
क्रमांक १७

प्रथमावृत्ति
सप्टेंबर १९५०

किमत १ रुपया

# गृहराज्यांत !

'सासुरवास' ही नाटिका प्रभात संगीत मंडळीनें कुरुंदवाड येथें भालचंद्र मेमोरियल हॉल मध्यें, दिनांक ७ माहे आक्टोबर सन १९३४ इ. रोजीं रात्रौ १० वाजतां प्रथम रंगभूमीवर आणली.

× × × ×

गृहराज्यांतील बेबंदशाही, अरेरावी व जुल्म जबरदस्ती युक्तिप्रयुक्तीनें नाहींशी करून 'सुखाचे संसार' कसे केले, हें चित्र या नाटिकेंत मोठ्या कुशलतेनें रंगविलें आहे.

× × × ×

ती. कै. दादांची (गणेशशास्त्री फाटक) ही प्रसिद्ध होणारी नाटिका चौथी होय. अजूनहि सहा नाटिका प्रसिद्ध व्हावयाच्या आहेत.

'पठाणी पाश' नाटिका प्रसिद्ध झाल्यानंतर मध्यंतरीच्या काळांत त्यांच्या दोन नाटकांचें पुनर्मुद्रण केल्यावर (माझी जमीन आ. ५ वी, पंतांची सून आ. ३ री) आज बरेच दिवसांनी या नाटिकेचें प्रकाशन होत आहे; याचें सर्व श्रेय 'बलवंत पुस्तक भांडार'चे मालक त्रिं. वि. परचुरे यांनाच आहे. त्यांनीं जर हें काम मनावर घेतलें नसतें, तर ही 'सासुरवास' नाटिका आणखीं किती दिवस अप्रकाशित राहिली असती हें सांगणें कठीण झालें असतें ! इत्यलंपल्लवितेन !

रसिकाचा नम्र सेवक

**नारायण कृष्णशास्त्री फाटक**

वाग्विहार मंदिर, कुरुंदवाड

## सासुरवास नाटिकेंतील पात्रें.

| | |
|---|---|
| काकासाहेब | भवानीबाई |
| सुरेश | सुधा |
| रमेश | प्रभावती |
| जगोबा | |
| डॉ. विभाकर | |



आवृत्ति पहिली.

# सासुरवास



## अंक १ ला

### प्रवेश १ ला



[ **स्थळ:**—इंद्रभुवन नांवाच्या शहरांतील, काकासाहेबांच्या बंगल्यामधील सुरेशची झोंपण्याची खोली. **वेळ:**—रात्रीं दहा वाजण्याची.
**पात्रें:**—सुरेश एकटाच असून, त्याची झोंपण्याची वेळ झाली आहे. तो पलंगावर बसून कांहीं प्रार्थनास्तोत्रें वगैरे म्हणत आहे. ]

**सुरेश :** भज गोविंदं भज गोपालम्......

**भवानीबाई :** ( आंतून ) सुरेश, माकडटोपी घातलीस का ? थंडी बरीच पडली आहे, कानाला वारंबिरं लागेल म्हणून म्हणतें !

**सुरेश :** नहि नहि रक्षति डुकृज करणे......

**भवानीबाई :** अरे, मी काय म्हटलं तें ऐकूं आलं का तुला ? माकडटोपी घातल्याशिवाय झोंपूं नकोस म्हटलं !

**सुरेश :** होय–होय, घातली आहे आई, माकडटोपी ! ती घातली म्हणून तर तुझी भाषा लवकर ऐकूं आली नाहीं!–भज गोविंदं भज गोपालम्......बहुत दिन नच भेटलों सुंदरीला......

**भवानीबाई :** ( आंतून ) सुरेश ! भजनांत हें काय म्हणतो आहेस ?

**सुरेश :** कांहीं नाहीं, आपलं सहजच !–भज गोविंदं भज गोपालम्...नच सुंदरी धरुं कोपा !......

**भवा० :** ( आंतून ) पुन्हा भजनांत नाटकांतलं पद म्हणूं लागलास का ?

**सुरेश :** आई, देवाचंच पद आहे हें ! श्रीकृष्ण रुक्मिणीला म्हणताहेत !......

**भवा० :** ( आंतून ) गाढवा !—

**सुरेश :** बरं, राहिलं आई !–भज गोविंदं भज गोपालम्...या तरुणा तांबुल द्याया लाज मला वाटते !......

**भवा० :** ( आंतून ) सुऱ्या ! काय फाजीलपणा चालविला आहेस ?

**सुरेश :** विडा घ्याहो नारायणा...भज गोविंदं भज गोपालम्—मला मदन भासे हा मोही मना......

**भवा० :** (आंतून) सुऱ्या ! पुन्हां जर तोंडांतून नाटकांतलं पद आलं, तर चांगलं तुझं डोकं फोडीन सांगतें ? हा कायरे मेल्या चावटपणा ?

**सुरेश :** नाहीं आई, आतां पुन्हां नाहीं ! ( दहाचे टोले पडतात. ) घटका गेली पळें गेलीं तास वाजे ठणाणा । आयुष्याचा नाश होतो राम कां रे म्हणाना ? ॥ ( इत्यादि भजन करून, देवाला नमस्कार करून, टाळया वाजवून व दिवा बारीक करून झोंपतो; इतक्यांत कोंपऱ्यांत चोरून उभी असलेली सुधा हळुच पुढें येते; दिवा मोठा करते. दिवा मोठा झालेला पाहून सुरेश घाबरतो; तो भिऊन ओरडणार इतक्यांत सुधा पुढें येते व आपली ओळख देते. )

**सुधा :** भ्यायचं नाहीं गडे ! म्हटलं आपली मी ती ! पाहायचं माझ्याकडे; मी ती आपली नाहीं का ?

**सुरेश :** (न्याहाळून पाहून व तिला जवळ घेऊन)कोण ? माझी सुधा ? वसुधातलावरील माझा मूर्तिमंत स्वर्ग ? अहाहा ! माझी सुधा ! माझी सुधा ! कौस्तुभ मण्याचा हा अमृतानं भरलेला डौलदार प्याला, एकाएकीं, अचानक माझ्यासमोर कसा आला ? मी स्वप्नांत तर नाहीं ?

**सुधा :** गडे, जरा हळू बोलायचं होईल का ? आमची भाषा जर का सासूबाईंच्या कानावर गेली......

**सुरेश :** तर दोघांचे कान तिच्या हस्तें लांबलचक होतील आणि हाडं खिळखिळीं होण्याजोग्या खरपूसशा शाबासक्या दोघांच्याही पाठीवर दिल्या जातील, असंच ना ? कबूल ! आतां या पुढची संभाषणं चिमण्या चिंवचिंव करतात त्याप्रमाणं एकमेकांच्या कानांत हळूच कुजबुजायचीं ! कबूल ! बरं पण आज तुला आईनं माझ्या खोलींत सोडलं कसं ?

**सुधा** : इतका सरळ संसार करूं दिल्यावर मग त्या सासूबाई कसल्या ? त्यांना वाटतं कीं, मी आपलं दर्शन घेऊं नये, आपल्याशीं बोलूं नये कीं, आपला विचार-सुद्धां मनांत आणूं नये ! त्यांनीं आपणा दोघांची लग्नगांठ मारली खरी, पण त्या गांठींत, एखादी लांकडाची अणकुचीदार कुणी खुपसावी, त्याप्रमाणं त्या स्वतः वन्सना बरोबर घेऊन मध्येंच येऊन बसल्या आहेत !

**सुरेश** : तें व्याख्यान आतां राहूं द्या एकीकडे, पण ही साळुंकी आपल्या खास घरट्यांत कशी आली, तें तर कळूं द्या ना आम्हांला !

**सुधा** : आज मी ठाम निश्चयच ठरविला कीं, काय वाटेल तें होवो, काय वाटेल तें करून आपल्या खोलींत यायचंच !—मग केलं काय ? जेवणं झाल्यावर पांचसहा लुगड्यांची वळकटी करून ती ठेवली माझ्या अंथरुणावर अन् तिला घातलं पांघरूण; जसं काय वाटावं मीच गुरगुटून झोंपलें आहें; असा देखावा तयार करून, आपण यायच्या आंत हळूच इथें आलें नि त्या तिथें लपून बसलें !

**सुरेश** : अस्सं ! अशी आईच्या न् ताईच्या डोळ्यांत धूळ फेंकलीस होय ? अग गुलामे ! पण असं वडील मंडळींना फसविणं बरं नव्हे, बरं कां ?

**सुधा** : हें फसविणं नव्हेच मुळीं ! जिकडचं माणूस तिकडे गेलं तर त्यांत वावगं काय झालं ?—

### ( पद : १ ले. केदार-केरवा )

**घन-कण्ठीं पडली, प्रेमानें बिजली ती; सांगा, नाथा ! यामधिं कोठें जनरीती चुकली ? ॥ धृ. ॥ सिन्धुगुणा भुलली आनंदें भरली ती ॥ गंगा कान्ता धांवत गेली; प्रियरूपीं विरली ॥ चंद्रमूर्ति दिसली; शृंगारें सजली ती ॥ भू-कासारीं तत्क्षणिं फुलुनी कुमुदिनि कां हंसली ? ॥ पाहुनी प्रीतीची लीला, वृत्ति माझी स्थिरावली ॥ चाललें त्याच मार्गानें म्हणो कोणी बुरी-भली ॥ १ ॥**

मी आपली गांठ पडावी म्हणून किती किती धडपड करतें म्हणून सांगूं ? पण माझ्याप्रमाणंच इकडच्या मनाला तळमळ लागत असेल कीं नाहीं कोण जाणे !

**सुरेश :** तळमळ ? आतां तुला काय सांगूं सुधा ? तुझ्या विरहानं मी सारखा तडफडत असतों ग ! आई म्हणते, 'देवाचं भजन कर !' पण मला वाटतं, या गोंडस देवीचीं सदा शृंगारिक गीतं गावींत ! तुझ्या ध्यासानं झोंपच लागत नाहीं आणि लागली, तरी तूं स्वप्नांत येतेस आणि मला अशी घट्ट मिठी मारतेस !

**सुधा :** मग माझ्यावर इकडची प्रीति आहे म्हणायची !

**सुरेश :** प्रीति ! तुझ्यावर प्रीति करायला, सुधा, मी तुला माझ्यापेक्षां निराळी मानीत नाहीं ग ! तूं म्हणजे मी आणि मी म्हणजे मीच ! जिथें दोघंही एक झालों तिथें कुणी कुणावर प्रीति करायची ?

**सुधा :** मग गडे, संसारांतील खरा, निर्मळ, स्वतंत्र, स्वर्गीय आनंद या घरांत उभयतांना मनमुराद मिळेल, असं इकडे वाटतं का ?

**सुरेश :** कसा मिळणार ? माहेरींच राहाण्यास चटावलेली प्रभावतीताई आणि सासूपणा गाजविण्यास सवकलेली—देवा, क्षमा कर रे बाबा !—आई—या दोन वाघिणींच्या पंजांत, उंदराच्या पिटुकल्याप्रमाणं बिचारा आमचा तरुण संसार सांपडला आहे !

**सुधा :** मग या काळ्यापाण्यावरून आपण पळून गेलों तर ?

**सुरेश :** पळून कुठें जायचं ?

**सुधा :** कुठें तरी लांब लांब—अगदीं लांब जाऊं !

**सुरेश :** आणि खायचं काय ?

**सुधा :** आपण कांहीं अशिक्षित नाहीं; नोकरी करूं !

**सुरेश :** सध्यांच्या बेकारी वातावरणांत नोकरी मिळणं महा मुष्कील आहे !

**सुधा :** तर मग आपल्या हक्काची भीक आहेच ! शिळ्या तुकड्यावर अर्धपोटीं राहूं; फाटक्या कपड्यावर लाज राखूं; वस्तीकरितां झाडाझुडपांचा आसरा घेऊं; पण चोवीस तास एकत्र राहूं, हंसूं, खेळूं आणि प्रीतीचा खराखुरा आनंद उपभोगूं ! स्वतंत्र आनंदाच्या साम्राज्याचीं आम्ही स्वतंत्र राजा-राणी झाल्यावर आमच्या सेवेकरितां सारी सृष्टिदेवी धांवत येईल ! पृथ्वी खऱ्या फुलांचा खरा गालिचा अंथरील; वायू वारा घालील; चांदण्यांच्या मदतीनं चंद्र आमचा रंग-महाल प्रकाशित करील; निर्झर पाणी पाजवितील आणि दयाळू दाते आमच्या मेजवानीची

तजवीज करतील !– गरिबींत स्वातंत्र्याचं सुख अनुभवूं पण हा श्रीमंतींतला कैदखाना मला तरी आतां सहन होत नाहीं !—

(पद २ रें. पटदीप–त्रिताल)

**नभिं पांखरा फिरावें गमे नाथ ! ॥ धृ०॥**
**रुचते तया काय मणी–पंजरागार ? ॥**
**मना मोहवीना धन्याचा पसारा ॥ २ ॥**

**सुरेश :** सुधा, तुझे विचार मला पटतात, पण घरच्या वडील मंडळीविरुद्ध बंड करण्याचं मला धैर्य होत नाहीं ! आईबापांची आज्ञा मोडणं म्हणजे पापच नव्हे का ?

**सुधा :** बरं तर मग, पुरे आतां ती बंडाची भाषा ! हिंदुस्थानच्या हवेला बंड मानवत नाहीं ! बंडाच्या वाटाघाटींत सारी रात्र निघून जाईल आणि मोठ्या मुष्किलीनं तयार केलेला गोविंदविडा तसाच पोलक्याच्या खिशांत राहून जाईल !

**सुरेश :** आण–आण, कुठें आहे तो विडा ? तारुण्यांत आईनं कितीही पोटभर जेवायंला घातलं असलं, तरी पत्नीनं विडा दिल्यावांचून खरं पोट भरतच नाहीं ! (ती देते; तो घेतो) अरेरे ! हा विडा तर वाळून नुसता कोळ झाला आहे ! हा पाहा, दाबल्याबरोबर त्याचा नुसता भुसा झाला !

**सुधा :** भुसा न होईल तर काय होईल ? चार दिवस झाले हा विडा करून ! पण इकडे देण्याची संधीच सांपडेना ! याचं साहित्य तर त्याच्याही पूर्वी आठ दिवस जमवीत होतें ! बाजाराची पट्टी आणावी तर तें मला पसंत पडेना ! विड्याची जुळणी करतां करतां शेवटीं कात मिळाला नाहींच ! असला अपुरा नि वाळलेला विडा म्हटलं, द्यावा कीं न द्यावा या विचारांत मी—

**सुरेश :** छे छे ! हा विडा मी मोठ्या आनंदानं खाणार ! कारण हा वरून वाळला असला, तरी याच्या पोटीं प्रेमाचा ओलावा आहे ना ? तसंच हा कट्टू कातानं नाहीं रंगला, तरी प्रीतीच्या गोडव्यानं रंगणारच !—

(पद ३ रें. भूप–एकका)

**ललित–रमणि–प्रणयाची अनुपम जगिं मधुरता ॥**
**अनुभवीन; मोहवीन, नृत्य करिन चाखतां ॥ ध्रु० ॥**
**दैवयोग गोड हा, लाभला मला पहा ॥ हरपवीन**
**सर्व भान; होय प्रेम–सफलता ॥ ३ ॥**

[ विडा खाणार इतक्यांत पलंगाखालून प्रभावती प्रवेश करते व मध्ये उभी राहते ]

**प्रभावती :** हं, दादा ! खबरदार विडा खाल्लास तर ! ( त्याच्या हातांतून विडा गळून पडतो; दोघे घाबरतात व खिन्न होतात. ) वहिनी, परस्पर दादाच्या खोलींत शिरून, विड्याचा लांच देऊन, असे बंडाचे बेत करतांना तुला थोडी तरी शरम वाटायला पाहिजे होती ! दम धर, तुला याचं प्रायश्चित मिळालंच पाहिजे ! आई ! ए आई ! ये, आधीं इकडे ये ! जश्शी असशील तश्शी ये ! ये लवकर ! घात झाला ! बघ केवढा घोटाळा झाला तो ! वैऱ्यांनीं बालेकिल्ल्यावर हल्ला केला ग, बाई ! आलीस कां आई ?

[ भवानीबाई प्रवेश करते ]

**भवानीबाई :** ही आलें ! अशी कां ओरडते आहेस प्रभावती ?

**प्रभावती :** ही पाहिलीस कां वहिनी दादाच्या खोलींत आणि हा विडा दादाच्या हातांत !

**भवानीबाई :** काय ही अवदसा माझ्या पोराच्या खोलींत ? आणि ती आमच्या परवानगीवांचून ? देवा ! देवा ! अशा जर सुना सासवांचा छळवाद करूं लागल्या, तर आम्हांला जीव देण्यावांचून गत्यंतर नाहीं ! प्रभे ! उद्यां ही भवानी कांहीं तुम्हांला दिसणार नाहीं ! मी मरणार ! उद्यां मी जीव देणार ? !

**प्रभावती :** नको आई, नको ग असं मनांत आणूंस ! आई, तूं गेल्यावर मी कुणाच्या आधारावर जगावं ? ( रडते. )

**सुरेश :** आई, मी तुझ्या पायां पडतों, पुन्हां नाहीं मी हिला खोलींत येऊं देणार ! आई ! एकदां मला क्षमा कर ! हें बघ, बायको मेली, तर दुसरी, तिसरी, चवथी मिळेल; पण आई गेल्यावर पुन्हां मिळेल का ?

**भवानी० :** नाहीं, आतां या घरांत–घरांतच काय, पण या जगांत राहाण्यांत सुद्धां मौज नाहीं ! जातें एकदां भरल्या कपाळानं ! अपमानापेक्षां मरण पुरवलं !

**प्रभावती :** ( पाय धरून ) आई ! मी तुझ्यापुढं पदर पसरतें ! नको ग मरूं ! असं काय बरं करतेस ?

**सुरेश :** आई ! अशी काय बरं स्वतांला भयंकर शिक्षा करून घेतेस ? अपराध आमचा; मला शिक्षा कर–हिला कर; पण तूं कां आपल्या जिवावर उदार होतेस ?

**भवा० :** नाहीं, ज्या घरांत वडील मंडळींची सद्दी संपली, तिथल्या वडील मंडळींनीं मेलंच पाहिजे !–प्रभे ! कारटे ! करा माझ्या ओटीची तयारी !

**प्रभा०** : अगबाई ! आतां काय करूं ! आई ! आई ! आम्हांला सोडून चाललीस ना ?—काका ! अहो काका ! धांवा हो धांवा !–रमेश ! रमेश ! चालली आई, चालली रे बाबा !—जगोबा ! जगोबा ! धांवा रे धांवा आणि आईला वांचवा !

( एका बाजूनें घाबऱ्या घाबऱ्या काकासाहेब व रमेश व दुसऱ्या बाजूनें जगोबा काठी व बालडीभर पाणी घेऊन प्र. करतात )

**काकासाहेब** : अरे, झालं काय तुम्हां सर्वांना असें ओरडायला ?

**रमेश** : या सर्वांत आईचा अवतार निराळा दिसतो आहे; तेव्हां मला वाटतं, आईलाच कांहीं तरी झालं आहे !

**जगोबा** : मी तर यांचा हा आरडा ओरडा ऐकून सर्व तऱ्हेच्या जय्यत तयारीनिशी आलों आहें ! साप निघाला असला तर हा सोटा आणला आहे ! चोर आला असला, तर फौजदाराकडे जाण्याच्या तयारीनं दारांत सायकल सज्ज करून ठेवली आहे ! भूत—प्रेत—पिशाच झपाटलं असेल, तर मंत्र—ताईत—गंडा हातांत हजर आहे ! आग लागली असेल, तर ही पाण्याची बालडी; सांगा, कसा कुठं मारा करायचा तो ! कोणी जेर असेल, तर मी स्वतःच स्वयंभू वैद्य आहें; बोला, गोळी घालून पांच मिनिटांत धुव्वा उडवितों रोगाचा ! कोणी आटोपलं असलं तरी हरकत नाहीं, पंचाची टापशी बांधून आलोंच आहें; लागतों पुढच्या तयारीला !—

**प्रभा** : जगोबा ! हा काय रे चावटपणा ? आई मरणाच्या दारीं बसलीं आहे आणि वाटेल तशी वडबड करतोस म्हणजे काय ?–काका जेवणं झाल्यावर वहिनीची संशयित हालचाल पाहून, मी दादाच्या खोलींत आधींच येऊन चोरून बसलें; तों वहिनी माझ्या अजमासाप्रमाणं खरंच इथं आली आणि दादाला फितवूं लागली !

**काकासाहेब** : मग सुरेश फितला का ?

**प्रभावती** : छेः, तो मुलगा कुणाचा बरं ? पण ही लावसट मात्र अगोचर खरी !–तें आईला कळतांच हिला शिक्षा करायची सोडून ही स्वतःच जीव देण्याची तयारी करूं लागली आहे !

**काका** : काय ग, सूनबाई ! हिच्या परवानगीवांचून तूं सुरेशच्या खोलींत येऊन त्याला फितवूं लागलीस ही गोष्ट खरी का ?

**सुधा** : होय. ही गोष्ट अगदीं खरी आहे.

**भवानीबाई** : बघा, बघा, चांडाळीण कशी निर्लज्जपणानं कबूल करते आहे ती !

**सुरेश** : मग आई, तिनं खोटं बोलावं असं का तूं म्हणतेस ?

**भवानीबाई** : चूप बैस मेल्या कवसालकुकड्या ! ऐकलेत निर्लज्ज सुनेचे उद्गार ? आतां करा तयारी माझ्या मरणाची !

**रमेश** : आई, तूं निघून गेल्यावर माझं लगीन कसं होणार ?

**काका** : काय ग, मग तूं खरंच का मरणार ?

**भवानीबाई** ; मरणार म्हणजे ? संशय आहे का ? तुम्हांला वाटलं, तर तुम्ही जगा ! मी मरणार !

**रमेश** : पण आई, आत्महत्त्येला कायद्यानं शिक्षा सांगितली आहे !

**भवानीबाई** : पुरे मेल्या तुझं ! जिवावर उदार झालेला जीव तुझ्या कायद्याला थोडीच भीक घालणार आहे ?

**काका** : तूं मरणार तर मी तरी तुझ्या कल्याणाच्या आड कशाला येऊं ? भरल्या कपाळानं, सवाष्णपणीं आणि तेंही सर्व नात्याची मंडळी हजर असतांना मरण येणं, म्हणजे स्त्रीचं मोठं सुदैवच समजलं पाहिजे ! जगोबा, कर हिची शेवटची तयारी ! कशी मरणार ? विष पिऊन, चितेंत उडी टाकून कीं पाण्यांत बुडून ?

**रमेश** : आई, तूं आपली पाण्यांत बुडूनच मर ! पाण्यांत शांतपणानं सारा व्यापार थंड होईल ! आगीनं न् विषानं तुझ्या अंगाची नुसती डोंब होईल अगदीं !

**काका** : प्रभावती, भर ओटी तुझ्या आईची !–हें बघ, चुकल्यामाकल्याची क्षमा कर ! आणि हांसत मुखानं विमानांत बसून वैकुंठांत जा !

**जगो०** : भवानीबाई ! आजवर मी तुमच्या घरची तिन्ही त्रिकाळ चूल पेटवली, पण आतां तुम्हांला कसं हो जिवंतपणीच पेटवूं ?

**भवा०** : मेल्यांनो ! तुम्ही सारीं मला मारायला बसला आहांत, पण मी मरायला पाहिजे ना ! माझा अहोरात्र छळ करणाऱ्या या अवदसेची खोड मोडीन, तेव्हांच मी मरेन !

**रमेश** : माझं लगीन होणार तर म्हणायचं !

**सुरेश** : आई, आतां कसं बरं समजूतदारपणानं बोललीस नी !

**काका** : अरे, आम्हांला तरी ही मरायला का पाहिजे होती ? आमचा जोडा फाटला नाहीं, हें चांगलंच झालं !– हं बोल, सुनेला या अपराधाबद्दल काय शिक्षा करायची ती !

**रमेश** : मला वाटतं वहिनींना आठ दिवस खोलींत कोंडून घालावं !

**सुरेश** : ही शिक्षा छान ! आणि ही पळून जाईल म्हणून मी करतों हिच्यावर पाहरा ! तुम्हीं कोणी येऊं नका ! मी पाहा कशी आणतों वठणीला हां हां म्हणतां ती !

**प्रभा०** : दादा, तुझा गनिमी कावा आम्हांला समजत नाहीं, असं तुला वाटतं होय ? तुम्ही दोघं एकांतीं एकत्र झाल्यावर आमच्या विरुद्ध काय कारस्थानं रचलीं जातील, तीं ढळढळीत माझ्या डोळ्यांना दिसताहेत, समजलास ?–आई, मला वाटतं हिला आठ दिवस उपाशीं ठेवावं !

**सुरेश** : अग, उपास करतां करतां ही मेली आणि त्या पुण्यानं वैकुंठांत जाऊन, हिनं देवाजवळ जाऊन आमच्या चहाड्या सांगितल्या, तर आमची भंबेरी उडायची ! त्यापेक्षां हिला खूप जेवावयाला घालून, हिची अजीर्णानं प्रकृति बिघडवावी, असं मला वाटतं !

(डॉक्टर विभाकर प्र. क.)

**विभाकर** : पण मी हा डॉक्टर विभाकर हजर असल्यावर कुणाची कधींही प्रकृति बिघडूं देणार नाहीं ! औषधं पाजीन, इंजेक्शन्स देईन, ऑपरेशन्स् करीन, पण रोगाचा फडशा पाडीन !

**भवा०** : अगबाई ! जांवई आले ! प्रभावती ! तुझे यजमान आले !

**काका** : कोण डॉक्टर विभाकर ?

**विभा०** : होय होय, तोच तोच ! (नमस्कार व विचारपूस होते) पण ही भानगड काय चालली आहे ? बंगल्याचीं दारं सताड उघडीं आहेत; रस्त्यावर गर्दी जमली आहे आणि आंत हा गोंधळ माजलेला आहे; काय आहे काय हें प्रकरण ?

**काका** : आपलं नेहमींचंच !-जगोबा, जा, जांवईबुवांना दिवाणखान्यांत नेऊन बशीव आणि यांच्या चहाफराळाची व्यवस्था कर !

**जगोबा** : ठीक आहे ! पण हे जांवईच आहेत ना ? नाहींतर जांवयासारखा वेष करून, एखादा गांवांतलाच ठोल्या फराळावर हात मारून जायचा !

**काका** : ए संशयात्म्या ! जा, वायफळ बडबड करूं नकोस, त्यांची नीट व्यवस्था कर. मी आलोंच तुझ्या मागोमाग !

**जगोबा :** चला मेहेरबान ! ( जातांना हळुच ) या सर्वांनीं मिळून या अनाथ पोरीवर कहर गुदरला आहे ! डॉक्टर ! तुमच्या पोतडींत कांहीं औषध असलं तर काढा आणि सोडवा बुवा या बिचारीला. चला माझ्या मागून ( त्याला नेतो. )

**रमेश :** डॉक्टर बहुतेक अक्काला नेण्याकरितां आले असावे !

**सुरेश :** आक्का ! सासरीं गेल्यानंतर सुखरूप पोचल्याचं पत्र पाठीव हं !

**प्रभा० :** माझं खेटर अडलंय सासरीं जायचं ! वाटलं तर, ते इथें येऊन राहतील; मी मुळींच जायची नाहीं तिकडे ! ( मिठी मारून ) आई, तूं मला सोडणार होय ? तुझी माझी ताटातूट झाल्यावर मी एक क्षण तरी जिवंत राहीन का ?

**भवानी :** तुला नाहीं बरं पाठवीत त्यांच्या बरोबर सासरीं !

**काका :** पण जिकडचं माणूस तिकडे गेलेलं बरं !

**प्रभा :** आई,—

**भवानी :** खबरदार असं बोलाल तर ! आपल्याला कां दहापांच मुलं आहेत ? जिव गेला तरी माझी मुलगी सासरीं जायची नाहीं ! ती इथंच राहणार आणि तिच्या नवऱ्यानं इथंच तुकडे मोडीत पडलं पाहिजे !—प्रभे, सुधेला घेऊन झोंप जा ! मी सुऱ्याला घेऊन जातें !—चल रे सुऱ्या !

**काका :** अग, पण जांवई आले आहेत, त्यांची कांहीं वास्तपुस्त ?

**भवानी :** तुम्ही आहांत कीं घरचे मोठे पुरुष त्यांचा समाचार घ्यायला ! पडा जा एकमेकांच्या गळ्यांत, जीव घुसमटेपर्यंत !—चल रे सुऱ्या ! ( त्याला घेऊन जातात. )

**प्रभा :** वहिनी, चल मुकाट्यानं माझ्याबरोबर ! ( तिला घेऊन जाते )

**रमेश :** काका, आतांपर्यंत घरांत एकेरी महायुद्ध सुरू होतं पण आतां विभाकर आल्यामुळें, तें दुहेरी होणार असा रंग दिसूं लागला आहे !

**काका० :** आणि तुझं लगीन झाल्यावर तें तिहेरीही होईल !—चला, काय होईल ते खरं ! " तुका म्हणे आता विटलों संसारा ! त्याहुनि बरा वनवास ! " ( जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ** : काकासाहेबांच्या घरांतील एक भाग;

**पात्रें**:—विभाकर व जगोबा

**विभाकर** : नमस्कार अन्नदाते !

**जगोबा** : मी अन्नदाता ? अन्नदाते तर काकासाहेब आहेत !

**विभाकर** : नाहीं, आमचे अन्नदाते तुम्हीच ! या घरांत इतकी मंडळी आहेत, पण पुष्कळ दिवसांनीं आलेल्या या जांवयाची कोणी वास्तपुस्त केली का ? तुम्हीं होतां, म्हणून तर आज माझ्या हातातोंडाची गांठ पडली !

**जगोबा** : पण मला वरचेवर संशय येतो, म्हणून विचारतों हं; रागावूं नका;- तुम्ही माणूसच आहांत ना ?

**विभाकर** : म्हणजे ?

**जगोबा** : केव्हां केव्हां भुतं रात्रीच्या वेळीं माणसाचा वेष घेऊन येतात म्हणून म्हणतों ! पावलं उलटीं नाहींत ना ?-आहेत सरळच आहेत !

**विभाकर** : अहो, जोंपर्यंत चाल सरळ आहे, तोंपर्यंत उलट्या पावलाचं पिशाच्चही माणूसच असतं; पण सुलट्या पायाचा माणूस उलट्या काळजाचा असेल, तर मात्र तो सैतानच समजला पाहिजे !

**जगोबा** : तुम्ही माणूस अहांत, हें ठाम ठरलं; पण तुम्ही जांवई आहांत, हें कशावरून ?

**विभाकर** : हा पाहिलात का फोटो ? ( दाखवितो. ) ही प्रभावती अशी खुर्चीवर बसली आहे आणि मी असा मागं उभा आहें. हा लग्नानंतर चार दिवसांनीं काढला होता. शिवाय तुम्ही फोटोच्या वेळीं हजर होतांच ना ? नाहीं कां आठवत तुम्हांला ?—सांगा आतां मी खरा जांवई आहें कीं नाहीं तें !

**जगोबा** : ( फोटो पाहून ) तुम्ही ताईसाहेबांच्या मागं उभे आहांत एवढ्यावरून तुम्ही त्यांचे यजमान कसे ठरतां ? डॉक्टर विभाकरांचे तुम्ही पट्टेवाले नसाल म्हणून कशावरून ?

**विभाकर** : पट्टेवाला असा प्रभाच्या खांद्यावर हात ठेवील का ?

**जगोबा** : नाहीं ! तुम्हीं अस्सल जांवईच दिसतां !-बरं पण तुम्ही ताईसाहेबांना न्यायला आलां, पण मी तुम्हांला ठाम सांगतों कीं, त्या बहुतकरून तुमच्या घरीं नांदायला येणार नाहींत ! त्या सुखासमाधानानं तुमच्या घरीं आल्या नाहींत, तर

तुम्हीं काय करणार ? त्यांची विनवणी करणार, त्यांचे पाय धरणार ? त्यांना दंडुका दाखविणार ? कीं, त्यांना कोर्टातर्फे ताब्यांत घेणार ? कीं त्यांचं नांवच टाकणार ?

**विभाकर :** लग्न होऊन एक वर्ष झालं. प्रभा फक्त माझ्या घरीं एकदांच आठ दिवस राहायला आली होती. त्यानंतर जो तिनं माहेरीं तळ दिला आहे, तो कायमचाच ! जगोबा ! मला कुणावर जुलूम जबरदस्ती करायची नाहीं. ती आनंदानं आली, तर तिला नांदायला नेईन, नाहींतर तिचा नाद सोडून मी दुसरं लग्न करीन !

**जगोबा :** पण प्रभावतीताईंना तुम्ही कसे नको बुवा ?

**विभाकर :** मी तिला पाहिजे आहें, माझा तिरस्कारही ती करीत नाहीं; मी तिला पाहिजे आहें, पण तें इथें येऊन राहायला पाहिजे आहे ! पण माझं घरदार सोडून मला सासऱ्याच्या घरीं कायमचं कसं राहतां येईल ?–जगोबा ! मी दोन कारणांनीं इथें आलों आहें; एक प्रभाला घरीं न्यायची आणि दुसरं सुधेला छळांतून सोडवायचं !

**जगोबा :** पण हें खरं ना ? बायकोचा सरळ घास पचवून वर वांकड्या दृष्टीनं सुधाताईची मुखशुद्धि करणार आहांत ? तुम्ही डॉक्टर लोक नाडी परीक्षेच्या मिषानं कुणाचा कसा हात धराल आणि 'थिटोकोपा' च्या सहाय्यानं कुणाच्या काळजाचा कसा ठाव घ्याल हें कुणी सांगावं ?

**विभाकर :** छे छे ! जगोबा ! काय भलतंच बोलतां हें ? अहो, ती मला भगिनीसमान आहे, समजलांत !

**( पद ४ थें, मिश्र पिलू—केरवा )**

**सुखसदना भागिनिना । कशि प्रेमळ माया या मना ॥**
**वदसी शंका भागिनी प्रेमा । काव्य कल्पना नाना ॥ ४ ॥**

**जगोबा :** अहो, ती म्हणजे कोण ? प्रभावतीताई कीं सुधाताई ?

**विभाकर :** अहो, सुधाताईच ! नाहीं तर बायकोची बहीण कशी होईल ?

**जगोबा :** अहो, काय नियम ? त्या विद्याहरण नाटकांत बायकोची बहणि झालीच कीं नाहीं ?

**विभाकर :** जगोबा, आतां इथली परिस्थिति मला सांगाल का ?

**जगोबा :** हो हो ! तुमच्या सासूबाई तर महाकालीचा अवतार आहेत ! तुम्ही त्यांना फितूर नाहीं ना होणार ? त्यांच्या तोंडाच्या तोफेपुढें इथले सारे वीर मुडद्यासारखे निपचीत पडतात ! आतां लवकरच महायुद्ध सुरू होणार आहे म्हणे !

मी तुम्हांला ठाम सांगतों कीं, जें राष्ट्र भवानीबाईना आपल्याकडे नेईल, त्यालाच बहुतकरून जय मिळणार !–तुम्ही सरकारी 'डिटेक्टी' नव्हे ना ?–तुमची बायको तर काय नुसती लसूण आहे, तिखट न् घाणेरडी ! सुरेशराव आंतून प्रेमळ, पण मातृभक्तीच्या शिळेखालीं सांपडलेला ! रमेश बेजबाबदार ! आणि काकासाहेब तर नुसता नंदीबैल आहे ! बायकोचं गांठोडं लागल्यामुळं तो तिचा मिंधा झाला आहे ! हें कोण येत आहे ?–चोर नव्हेना ? कां भूत ? ( काकासाहेब प्र. क. ) छे ! काकासाहेबच !

**काका** : जगोबा, गप्पा काय मारीत बसला आहेस ? पाहुण्यांना बिछाना घालून दे ना !–डॉक्टर, जगोबा म्हणजे आमच्या घरची एक जुनाट, दिव्य वल्ली आहे ! याच्या बटव्यांत पाहिलंत का काय काय जिन्नस आहेत ते ?

**विभाकर** : काय काय आहेत ?

**काका** : चिमटा, चाकू, कात्री, लिंबू, ओवा, सुंठ, अफू, थर्मामिटर, निलगिरी, गांजा, भांग, सोमल, एरंडेल, कुचला,–सर्व कांहीं आहे ! कोणत्यावेळीं काय प्रसंग येईल आणि कोणत्या वेळीं कोणता जिन्नस उपयोगी पडेल याचा नियम नाहीं ! असं याला नेहमीं वाटत असतं !

**विभाकर** : असं असेल तर, संशयी पण दूर दृष्टीचा जगोबा शहाणाच म्हटला पाहिजे ! पण काकासाहेब ! आपल्या घरीं सासुरवासाचं भीषण भूत तांडव करीत आहे, यावर तुम्ही कांहीं उपाय काढला आहे का ?

**काका** : कोण म्हणतो माझ्या सुनेला जाच होतो म्हणून ?

**विभाकर** : हे पाहा, दशदिशांतून, भिंतीच्या कणाकणांतून त्या बिचाऱ्या गरीब गाईनं फोडलेल्या कठिण किंकाळ्यांचे पडसाद मला स्पष्ट ऐकूं येताहेत ! जणुं काय ग्रामोफोनच्या रेकॉर्डप्रमाणं त्यांत ते कायमचेच उमटले आहेत !–काकासाहेब ! आपल्या पाषाण हृदयाला तें समजत नसलें तरी ते माझ्या मानवी हृदयाला चटके देत आहेत !

**काका** : माझं हृदय पाषाणाचं काय ?—

**विभाकर** : नाहीं, चुकलों, आपलं हृदय खात्रीनं पाषाणाचं नाहीं ! पाषाणाचा देव बनतो आणि हजारों लोकांची दैना दूर करतो ! पाषाणाचा किल्लेकोट होतो आणि स्वतःच्या अंगावर तोफांचे गोळे घेऊन दुर्बलांचें रक्षण करतो ! पाषाण सुरुंगांनीं स्वतःच्या अंगाच्या ठिकऱ्या ठिकऱ्या उडवून घेतो, पण स्वतःच्या पोटांतील गार न् गोड पाण्यानं तान्हेल्यांचा अंतरात्मा शांत करतो ! चंद्रकांता-

सारखा दगड, चंद्रकिरणांनींही पाझरतों! पाषाण इतका उदारचरित असतांना, त्याची आपल्या हृदयाला उपमा देणं म्हणजे त्याचा अपमान करण्यासारखंच आहे!

**काका :** डॉक्टर, ही बेजबाबदार भाषा एकदम बंद कराल, तर काय बहार होईल! तुम्हांलाच तेवढा काव्यमय शिमगा साजरा करतां येतो आणि मला येत नाहीं, असं समजतां काय? आमच्या घरची परिस्थिति तुम्हांला काय माहीत आहे हो? तुम्हाला इथं येऊन पुरते दोन तासही झाले नाहींत, तोंच तुम्ही आम्हांला अपराधी ठरवून आमच्या सुनेचा कैवार घेऊं लागलांत!– हा तुमचा शुद्ध मूर्खपणा होत आहे!

**विभाकर :** मला इथं येऊन दोन तास झाले असले, तरी तुमच्या घरांतील खडा न् खडा माहितीचे रिपोर्ट आतांपर्यंत माझ्या स्नेह्यांकडून माझ्याकडे लेखी आलेले आहेत! जुल्मजबरदस्ती आंतल्या आंत कितीही दाबली, तरी पाण्यांत केलेल्या प्रातर्विधीप्रमाणं ती बाहेर प्रगट झाल्याशिवाय राहात नाहीं! आई, बाप, माहेर नसलेली गरीब बिचारी सुधा, तुमच्या मुलखमैदानच्या सपाट्यांत आतांपर्यंत जिवंत तरी कशी राहिली, याचंच मला आश्चर्य वाटतं!– काकासाहेब! मी आपल्याला हिताचा इषारा देऊन ठेवतों, बऱ्या बोलानं तुम्ही सुनेला न् लेकाला निराळा संसार मांडून द्या आणि त्यांना सासूबाईच्या पंजांतून सोडवा; नाहींतर, या मूर्ख, क्रूर आणि अदूरदर्शी बायकांच्या पायांत तुमच्यावर ऊर बडवून, आक्रोश करीत ढसढसा रडण्याचा कुप्रसंग खात्रीनं कोसळल्याशिवाय राहाणार नाहीं, ही खास खूणगांठ बांधून ठेवा!

**काका :** बस् बस्! तुमच्यासारख्या उतावळ्या दीड शहाण्यांनीं आमच्या घरीं उपदेशाच्या पुरचुंड्या सोडविण्याची कांहींच जरूरी नाहीं! तुमच्या बोधाचे डोस रिचवून घेण्याइतका कांहीं आमच्या मेंदूचा गोदाम रिकामा पडला नाहीं! तुम्हांला मुकाट्यानं इथें चार घांस खाऊन राहायचं असेल तर राहा; नाहींतर आल्या-पावलीं आपला रस्ता सुधरा! जोंपर्यंत मर्यादेंत आहे तोंपर्यंत जांवई; अमर्यादा झाली कीं, जांवयाला जनावर समजून त्याच्या पाठीवर रट्टे द्यायला हा खवीस काका कधींही कमी करणार नाहीं, समजलांत! (जगोबास) पेंगतोस काय असा? काय पुराण चाललं आहे काय? (मारतात)

**जगोबा :** (जागा होऊन) धरणकिंप! भूकंप! ज्वालामुखी जागा झाला!! भिंती कोसळल्या! जमीन फाटली! छप्पर कडाडलं! गाडला गेलों! पुरला गेलों! धांवा! मेलों! मला काढा!!

**काका :** ए गाढवा ! ओरडायला काय झालं असं ? या संशयात्म्याला झोपेंत भूकंपाचं स्वप्न पडलं वाटतं ! ए मूर्खा ! जागा झालास का ? भू नाही न् कंप नाहीं ! आम्ही बोलत होतों समजलास !

**जगोबा :** असं होय ? आज मी वर्तमानपत्रांत धरणीकंपाच्या बातम्या वाचल्या होत्या त्याचा उमटलेला ठसा आणि तुमचा आवाज यांचं मिश्रण होऊन हें स्वप्न तयार झालं वाटतं ! तुम्ही सारे जिवंत आहांत ना ? भवानीकाकू धडधाकट आहेत ना ?

**काका :** सारीं सबंध शाबूत आहेत. समजलास ? भिऊं नकोस ! यांना घेऊन जा, बिछाना घालून दे आणि यांच्या सोबतीला तूं यांच्या जवळ झोंप ! जा अधीं !

( जातात )

**जगोबा :** डॉक्टरसाहेब !

**विभाकर :** जगोबा ! प्रेमळ दोस्ता ! कनवाळु जिवा ! चल, तो बिचारा सुधेचा जीव सुखी होईपर्यंत, मला या घरांत अपमानाच्या कटू गोळ्या गिळीत मुकाट्यानं राहिलंच पाहिजे ! जगोबा ! या सैतान शाहींत फक्त तूंच एक मला माणूस दिसतो आहेस !

**जगोबा :** होय ? खरं ? तर मग या माझ्या स्तुतीबद्दल तुम्हांला ही भांगेची वडी देऊन मी तुमचं अभिनंदन करतों ! घ्या ही. पांचसहा वेळां उपयोगी पडेल ! चिंचोक्याएवढी खाल्ली, तरी गारेगार झोंप लागते ! जास्त खाऊं नका हं ! नाहींतर नाचायला लागाल !

**विभाकर :** आण, आण दोस्ता ! आण ती चीज !

( घेऊन जातात.)

---

## प्रवेश ३ रा.

[ स्थळ–दिवाणखाना; पात्रें–सुधा हुंदके देत दिवाणखाना झाडीत आहे ]

**सुरेश :** ( प्रवेश करून ) सुधा ! सुधा ! ( ती बोलत नाहीं ) माझ्याशीं कां ग अबोला धरलास ? या कोंडलेल्या वातावरणांत तूंच काय तो माझ्या सुखाचा निश्वास ! ( तो स्पर्श करतो, ती झिडकारते ) सुधा ! हें काय बरं ? तारुण्यांतली तूं खरी आनंद–मूर्ति ना ? या चंद्राच्या चेहऱ्यावर तजेला आणणारी तूं रजनी, या फुलाला प्रफुल्लित करणारी तूं उषा अन् तूं माझ्यावर रुसलीस तर......

**सुधा** : पुरे पुरे ही साखरबोली ! या असल्या, जीव नसलेल्या गोड भाषेनं तुम्ही माझ्या यातना मात्र दुप्पट वाढवितां ! भुकेनं तडफडणाऱ्या जिवाला नुसतं अन्न दाखवायचं, द्यायचं नाहीं एक शीतही; असे तुम्ही माझे हाल करीत आहांत !

**सुरेश** : हें पहा, आतां मी शपथपूर्वक सांगतों—

**सुधा** : लग्नांत घेतलेल्या शपथांची वाट काय लावलीत, त्याचं आधीं समाधानकारक उत्तर द्या आणि मग नव्या शपथा घ्या !—तुम्ही माझे देव आहांत, पण निर्दयतेनं नासलेले आहांत ! तुम्ही पुरुष आहांत, पण भीतीनं बिघडलेले आहांत ! तुम्ही माझे पति आहांत पण बेफिकीरीनं बेजबाबदार झालेले आहांत !—नका, तुम्ही माझ्याकडे बघुं नका, मला स्पर्श करूं नका, माझ्याशीं बोलूं नका, मी मेलें असं समजून आणखी एका गाईला बळी देण्याकरितां दुसऱ्या लग्नाच्या नादाला लागा, जा, चला—

## पद पिलु–दीपचंदी

**॥ भंगुनीया दिलरुबा माझा, रसिका गोड गाणें गा ! ॥**
**॥ जाळुनीया मत्सुखा, राया ! उडवी अंतरीं रंगा ॥**
**॥ चेचुनीया मम जिवा, दुसऱ्या हे जिवा जागा ॥**
**॥ घेऊनीया नैक बळी, घालीं मृदूला ! घोरस पिंगा ! ॥**

**सुरेश** : बस् बस् ! माझी प्रतिज्ञा हीच कीं, कुणाच्याही भीतीला, भिडेला बळी न पडतां तुझ्या सुखाकरितां अहोरात्र झटायचं ! तूंच माझी जीवज्योति ! तुझ्यावर नुसती कोणी फुंकर टाकली, तरी माझ्या डोळ्यांपुढं दुःखाचा काळोख उभा राहील !

**सुधा** : ही प्रतिज्ञा घटकाभर राहील, तर मी माझें भाग्य समजेन !

**सुरेश** : घटकाभर कां ? ही माझी आजन्म प्रतिज्ञा आहे !—लाडके ! आतां खात्री पटली ना ? मग कां बरं डोळ्यांत अश्रु ? एकदां तें तुझं एका गुलाबी गालावर झुकणारं मोहक हास्य दिसूं दे ना आम्हांला ! हांस ना ! पाय धरूं का ?—हांस ना ! ( ती हासते. ) अहाहा ! या हास्यानं मी ताजातवाना—धीरवीर—निर्भीड—खंबीर—स्वतंत्र मनाचा झालों ! आतां मी कुणालाही दाद देणार नाहीं !—मी लागूं कां तुझ्याबरोबर झाडायला ?—तुझे हे कोंवळे हात—( झाडणी घेतो. )

**भवानीबाई** : ( आंतून ) सुऱ्या ! बायकोजवळ लुडबुडतो आहेस वाटतं !

**सुरेश** : अंहं:, नाहीं ग-!

**भवानी०** : ( आंतून ) मग तिकडे काय करतो आहेस ?

**सुरेश** : कांहीं नाहीं, फोटो पाहतों आहें !

**भवानी०** : ( आंतून ) कुणाचा, बायकोचा वाटतं ?

**सुरेश** : नाहीं ! नाहीं !

**भवानी** : चल, इकडे ये अर्धी !

**सुरेश** : येतों ग येतों ! ( जाऊं लागतो )

**सुधा** : दम धरा. जाऊं नका ! तुमच्या मनाची मला परीक्षा पाहायची आहे ! इथं बसून राहा ! मघाच्या आणाशपथा इतक्यांत विसरलांत वाटतं ? ( हात पकडते )

**सुरेश** : सोड ग, सोड मला !– आई बोलावते आहे !–गेलं पाहिजे मला !–सोड ना !-पायां पडूं का तुझ्या ? ( आंतून भवानीबाईच्या हाका ) येतों येतों ना आई ! हिनं माझा हात......सोड पाया पडतों तुझ्या ! ( पायां पडतो ) आईपुढं माझं कांहीं चालत नाहीं.

( गडबडीनें निघून जातो; सुधा रडूं लागते; विभाकर प्रवेश करतो )

**विभाकर** : सुधाताई ! तुम्ही विनाकारण कां रडतां ?

**सुधा** : डॉक्टर, रडूं नको तर काय करूं ? हे सुखाची आशा दाखवितात, प्रेमामृताचा प्याला अगदीं ओंठांजवळ आणतात; पण त्यांतला एक थेंबही जिभेवर पडण्यापूर्वीच, दुसऱ्यानं मारलेल्या तडाख्यानं भेदरून जाऊन तो हातचा फेंकून देतात ! डॉक्टर ! निर्भेळ यमयातनेपेक्षां हीं सुखस्वप्नंच जिवाचे हाल अधिक करतात !

[ पद झिंझोटी दीपचंदी ]

**आशा दावि जीवा । देवा न दोष द्यावा ॥**
**प्रेमा फोल ठरला । सौख्याचि नाहि सीमा ॥ ध्रु ॥**
**बंदी गुलाम महिला । पतिदेव त्याज्य बनला ॥**
**देवा सुखा मनाला । उरली जराही आशा ॥**

**विभाकर** : सुरेश तसा मनाचा प्रेमळ, निर्मळ, न् दयाळु आहे; पण खंबीर नाहीं ! कळतं आहे पण वळत नाहीं ! त्यानं थोडं धैर्य धरलं, तर तुमचं

काम होऊन जाईल; पण आईच्या डोळ्यांत अखंड पेटलेल्या भट्टीपुढं याच्या निश्चयाच्या पोलादाचं हां हां म्हणतां पाणी होऊन जातं !–सुधाताई ! तुम्ही भिऊं नका. मी तुमचा संसार जुळविण्याकरितांच आलों आहें ! मी प्रभावतीला घरीं घेऊन गेलों कीं, तुमचा छळ निम्मा कमी होईल. या सर्व राक्षसी-व्यक्तींना कसं कैचींत धरावं, याचा सारखा विचार करतों आहें !

**सुधा** : माझा एक तऱ्हेनं का हे छळ करतात ? मला वरचेवर उपाशीं ठेवून काम मात्र भरपूर करून घेतात ! कुणाला कांहीं रोग झाला कीं, मींच कांहीं तरी चेटूक केलं असेल असं समजून मला मारतात! लक्तरं नेसायला, टिनपाटं वापरायला, शिळं आंबलेलं–बुरसलेलं जेवायला नि गुरांचा गोठा झोंपायला देतात ! त्यांची न् माझी महिना महिना गांठ पडत नाहीं ! ते तिकडे तडफडत असतात; मी इकडे धडपडत असतें ! डॉक्टर, या सर्वांनीं माझा छळ करावा असा मी ह्यांचा अपराध तरी काय केला आहे हो ?

**विभाकर** : अपराध एवढाच कीं, भवानीबाईंना आतांपर्यंत एकतंत्री सत्तेनें संसार करण्याची लागली आहे चटक; पण या पुढं आपली सुंदर न् सुशिक्षित सून नवऱ्याला मुठींत ठेवून तो आपल्या हातांत घेईल, अशी यांना भीति वाटते !

**सुधा** : पण मला संसार हातांत घेण्याची मुळींच महत्त्वाकांक्षा नाहीं ! त्या खुशाल संसार करूं द्यात. फक्त माझ्या देवाचा विरह मला न व्हावा, एवढी एकच माझी इच्छा आहे !

**विभाकर** : शिवाय कोणतीही स्त्री सासू किंवा नणंद झाली कीं, तिच्या अंगांत एकदम भुताचा संचार होतो, त्याला कोण काय करणार ?

**सुधा** : घरांतले पदार्थ भाऊजी न् वन्सं चोरून खातात आणि ते कमी झाले कीं, सासूबाई न् मामंजी माझ्यावर चोरीचा आळ घेऊन मला मारतात !

**विभाकर** : ते पदार्थ कोण करतं ?

**सुधा** : माझ्याकडूनच करवून घेतात !

**विभाकर** : अस्सं !–पुन्हां जेव्हां तुम्हाला पदार्थ करायला सांगतील, त्या वेळीं ( खिशांतून पुडी काढून ) –ही–माजुमची–म्हणजे भांगेची वडी–कुणाला न कळवितां–त्यांत घाला !–पहा तरी चोरून खाणाऱ्यांची कशी फटफजिती होते आहे ती ! ( देतो. ) मात्र तुम्ही यांतला एक कणही खाऊं नका हं ! नाहीं तर कैंस मोकळे सोडून थै थै नाचायला लागाल !

**सुधा** : डॉक्टर ! असलं कांहीं तरी करण्यापेक्षां माझ्याच जिवाचं कांहीं बरं वाईट झालं, तर माझी सुटका होऊन सर्वांनाच आनंद होणार नाहीं का ? डॉक्टर ! द्या ना तसलं एखादं जहरी विष !

**विभाकर** : ताई ! डॉक्टरांनीं रोग्याला तारायचं कीं मारायचं हो ?

**सुधा** : रोग बरा होत नसेल, तर त्याच्या पुढच्या यातना चुकविण्याकरितां त्याला गोळी घालून मारायचंच !

**विभाकर** : हात जोडतों सुधाताई तुमच्यापुढं; एवढं मात्र करा कीं, तुम्ही मरूं नका ! आत्महत्त्या हा दुबळ्या लोकांचा मार्ग आहे ! मानवी प्राणी आत्महत्त्या करण्याकरितां खास जन्माला आला नाहीं ! मी तुम्हांला इथेंच सुखाचे दिवस खचित दाखवीन ! ते अशक्य झालं, तर मी तुम्हांला माझ्याबरोबर नेईन, शिक्षण देईन, आणि स्वतंत्र व्यक्तिमत्वानं तुम्हांला जगापुढं आणीन; इतकंही करून तुम्हांला सुख मिळालं नाहीं, तर ( हांसून ) तुम्हांला तुमचं आवडतं विषही देईन, समजलांत ! सुधाताई ! तुम्ही आतां ( कानांत, असं नाटक करा ! ( कानांत ) असं चापून बोला ! येईल लवकरच प्रसंग ! ( कानांत ) या धोरणानं चालू दे भाषा ! याप्रमाणं कराच ! धरा धैर्य या वेळीं ! ( रमेश येऊन पाहून जातो )

**सुधा** : अगबाई ! काय म्हणतां ? असं करूं ? आणि कांहीं भलतंच झालं तर ?

**विभाकर** : तुम्ही घाबरूं नका. मी आहें ना तुमचा पाठीराखा ? ( कानांत ) याप्रमाणं कराच तुम्ही !

**सुधा** : बरं तर करतेंच तसं ! होऊं द्या एकदां सोक्षमोक्ष !– माझा अभिमान त्या परमेश्वरालाच !—

**[ पद सौभाग्य सौभाग्यवती—केरवा ]**

**॥ त्या पूज्य देवराया ! हृदयास धीर याया ॥**
**॥ भावें त्रिकाल नमितें, देईल तोचि विजया ॥ ध्रु० ॥**
**॥ दुबळ्यास हात देतां, आनंद त्या सदाचा; ॥**
**॥ झिजवीत दीन-वाली संतार्थ कांत काया ॥**

( भवानीबाई, प्रभावती व रमेश प्र. क. )

**रमेश** : मी प्रत्यक्ष पाहिलं, आई, मी प्रत्यक्ष पाहिलं ! वहिनीच्या अगदीं कानाजवळ डॉक्टरांचे ओंठ होते !

**प्रभावती** : अगोबाई ! काय म्हणतोस ? यांचे ओठ वहिनीच्या कानाजवळ ? मग हिच्या कानाजवळचे ओंठ गालाजवळ यायला कितीसा उशीर लागणार ? आई ! पाहिलंस ? तुझे जांवई किती नीच न् अधम आहेत ते ? अन् तूं म्हणतेस यांच्याबरोबर नांदायला सासरीं जा म्हणून !

**भवानीबाई** : काय म्हणतोस रम्या ? डॉक्टर या अवदसेच्या कानांत कुजबुजत होते ?

**रमेश** : होय आई, पुटुपुटु कांहीं तरी चाललं होतं !

**भवा०** : अरे बाबा, हें कुजबुजणं नव्हे बरं; पुढें जो आमच्यामध्यें भांडणांचा भडका उडणार आहे, त्याच्या या ठिणग्या पडताहेत ! त्याच्या आधींच ही आग विझवली पाहिजे !–रम्या ! दे दोन मुस्कटांत या सटवीच्या ! दुसऱ्याच्या कानांत कुजबुजते म्हणे कुजबुजते ! ( तो मारण्यास जातो. )

**विभा०** : रमेश, सुधाताईच्या अंगाला हात तरी लाव, त्याक्षणीं तुझं तोंड फोडून त्याचा लाल भडक मारुती बनवीन, समजलास ?

**रमेश** : आई, आमच्याच घरीं घेऊन हे आम्हांला दमदाटी देतात बघ ग !—तुमचं वाटोळं होईल !–तुमचं निसंतान होईल !

**भवानी** : मेल्या ! असला श्राप देऊं नकोस आणखीं ! त्यांचं कसलं डोंबलाचं वाटोळं होणार ? वाटोळं होईल आमचंच !

**रमेश** : मला वहिनींच्या अंगाला हात लावूं देत नाहींत काय ? मी कोरडा आणून लांबूनच त्यांच्या पाठीवर कोरडे उडवितों ! ( चाबूक आणतो. )

**विभा०** : ( पट्कन् हातांतला चाबूक काढून घेतो.) दम धर, याचा प्रसाद तुलाच आधीं देतों ! ( मारतो; तो ओरडतो.)

**भवानी** : हं खबरदार त्याच्या अंगावर हात टाकाल तर !

**विभा** : आणि तुम्ही सुधाताईच्या अंगावर हात टाकतां तो ?

**भवानी** : ती आमची सून आहे; आम्ही काय वाटेल तें करूं !– सटवीला चोरून खायला पाहिजे, परक्याच्या कानांत गुलगुल गप्पा मारायला पाहिजेत, ऐदीपणानं गिळायला पाहिजे, मग मार खायला कां नको ?

**प्रभा** : नवरासुद्धां कैवार घेत नाहीं, इतका हे घेताहेत !–इतका कां यांना पुळका आला आहे ?–आई ! खात्रीनं तुझ्या लेकीबरोबर तुझ्या सुनेलाही पळविण्याचा यांचा बेत असावा !

**विभाकर** : तुझ्या जिभेला हाड आहे कीं नाहीं ? तुला माझ्या घरीं राहायला यायचं नसेल तर, नको येऊं; पण त्या पायांत या विचाऱ्या—मला भगिनीसमान असलेल्या सुधाताईच्यावर कां विनाकारण गहजब ?

**भवानी०** : ( सुधेला गदगदा हलवून ) ही सटवी म्हणे यांची बहीण—! धर हिला ! या चांडाळणीला खोलींत कोंडून हिचीं हाडं चांगलीं नरम करूं या ! तेवढ्या-नही भागलं नाहीं, तर उलथन्यानं खरपूसशी भाजून काढूं या !

**सुधा** : डॉक्टरसाहेब !– डॉक्टरसाहेब !–

**भवानी०** : डॉक्टर गेले मसणांत ! चल आधीं आंत ! ( दोघी तिला मारीत नेतात; विभाकर विषण्ण चित्तानें इकडे तिकडे फिरतो तोंच जगोबा प्र. क. )

**जगोबा** : कोण ? तुम्ही डॉक्टरच ना ? इथं कुणी नाहीं, असं पाहून फर्निचर पळवायला आलेले उचले चोर नव्हेत ना ? ( पाहतो ) होय, जांवईबुवाच ! जांवईबुवाच !

**विभाकर** : पहा, अजूनी खात्री करून घ्या ! नाहींतर मी तुम्हांला भूत, प्रेत, पिशाच्च, झोटिंग, दरवडेखोर, जनावर, पक्षी वगैरे कुणीतरी वाटायचा !

**जगोबा** : छे हो, बहुतकरून ठाम तुम्ही डॉक्टरच ! तुम्ही भूत असतां, तर दिवसा दिसलां असतां कां ? तुम्ही दरवडेखोर असतां, तर काळेभोर नसता कां ? जनावर असतां तर तुम्हाला पंख अन् पक्षी असतां तर तुमच्या डोक्यावर शिंगं दिसलीं नसतीं कां ?

**विभाकर** : कां आज हिरव्या घोड्यावरचा फेरफटका जास्त झाला आहे वाटतं ?

**जगोबा** : तें कशावरून म्हणतां ?

**विभाकर** : जनावरांना पंख फुटून, पक्षांच्या डोक्यावर शिंगं उगवलीं म्हणून म्हणतों !

**जगोबा** : डॉक्टर, मला या घराचा आतां मात्र खरा वीट आला ! अहो, भांग वाटतांना आणि ती छानतांनासुद्धां माझा जीव खालींवर होतो, पण सुधाताईंना पहारीखालीं चेंचतांना आणि उचलून दण्दिशीं आदळतांना या नरराक्षस-राक्षसींना केंसभर सुद्धां वाईट वाटत नाहीं ! अहो, निर्जीव गांजाच्या गोळयावर निखारा ठेवतांनाही माझा जीव भाजून निघतो, पण त्या बिचाऱ्या सुनेला डागण्या देतांना यांना कांहीं हो वाटत नाहीं !

**विभा०** : आंत असाच कांहीं प्रकार चालला आहे वाटतं ?

**जगोबा** : त्या बिचारीला बदड बदड बदडून खोलींत कोंडून घातली आहे आणि आतां मायलेकरांच्या गोष्टी चालल्या आहेत–डॉक्टर ! मला तुमच्या तिकडे घेऊन चला, मी होतों आपला अवडंबर !

**विभाकर** : अवडंबर ?

**जगोबा** : अहो, अवडंबर !–औषध मिसळून देतो तो !

**विभाकर** : हं हं ! कंपौंडर होय ? तुम्हाला कंपौंडर करायचं म्हणजे सर्वांनीं मृत्युपत्र करूनच दवाखान्यांत यायला पाहिजे !–जगोबा, आपण दोघे मिळून लवकरच या घराची घडी बसवूं, समजलात (सुरेश प्र. क.)

**सुरेश** : डॉक्टर, तुम्ही आपल्या बायकोकडे लक्ष द्यायचं सोडून माझीच बायको फितवूं लागलांत !–आई असं शपथेवर सांगते आहे !

**विभाकर** : तुमच्या आईनं या गोष्टी शपथेवर कशाला सांगायला पाहिजेत ? मी सांगतों ना ? या रंगेल विभाकरावर तुमची बायको खूष आहे ! माझ्या प्रेमाचा उपःकाल तिच्या दिलाची एकेक पाकळी फुलवीत आहे ! आणि मीही पण त्या चटकचांदणीच्या प्रेमप्रकाशानं बेफाम पागल बनलों आहें ! सुरेश ! वस्तुस्थिति ही अशी आहे !!

**सुरेश** : असं बोलतांना तुम्हाला लाज वाटत नाहीं ?

**विभाकर** : लाज कां वाटावी ? आपल्या मोहक गुणांनीं, आजुबाजूच्या नखरेल तरुणींना वेड लावणं यांत केवढा ब्रह्मानंद भरला आहे याची जाणीव तुम्हांला कशी असणार ? प्रेमाच्या जादूनं तुमची पत्नी आपल्याकडे ओढून मी कांहीं तरी बरं वाईट कृत्य केलंच आहे ! आणि तें नाकबूल करून, वर खोटं बोलण्याचं पाप कशाला करूं ? छे, तें शक्यच नाहीं ! सुरेश, या पुढं तुम्ही सुधेचे निवळ नांवाचे पति; पण तिच्या प्रेमाचा खरा प्रियकर हा विभाकर—

**जगोबा** : अरे बापरे ! तुम्ही बोलून चालून उघड उघड बदमाष दिसतां ! माझी शंका खरी ठरली म्हणायची ! बाकी चोरून केसानं गळा कापणाऱ्या संभावीत सोद्यापेक्षां, समोरून डोक्यावर कुऱ्हाडीचा घाव घालणारा उघडा शत्रू पुरवला !

**सुरेश** : निर्लज्ज नराधमा ! थांब, तुझा खूनच पाडतों ! फांशी गेलों तरी बेहत्तर ! (धांवतो, विभाकर त्याला हसत आवरतो)

**विभाकर :** सुरेश ! खुनाच्या गोष्टी तुम्ही पांढरपेशांनीं कशाला बोलाव्या ? ढेंकूण मारतानांही मूर्च्छित पडणारे रणशूर तुम्ही ! टिन्च्या पोकळ डब्याप्रमाणं खणखणीत आवाजांत बडबडणं हीच तुमची शेवटची सीमा !

**जगोबा :** मला संशय आला होता त्याप्रमाणं तुम्ही कांहीं जांवई दिसत नाहीं ! मोहक मैनांच्या माना मुरगळणारे बोकोबा दिसतां !– थांबा, आणतों साऱ्या मंडळींना—काकासाहेब !–अहो भवानीबाई !–( जातो. )

**विभाकर :** आणि तुम्ही तरी माझा खून कां करावा ? मी काय तुमचं घोडं मारलं आहे ?– भल्या गृहस्था ! तूं सुधेचा " पत्नी " म्हणून स्वीकार केलास; तिचं पालन, पोषण, रक्षण करीन, म्हणून शपथ वाहिलीस; आणि आतां या घरच्या राक्षसी तिचा छळ करीत असतांना मूग गिळून स्वस्थ बसतोस ? तुम्ही तिच्याकडे प्रेमानं पहात नाहीं, पाहिलंत तरी बोलत नाहीं, बोललांत तरी त्याप्रमाणं वागत नाहीं, वागलांत तरी शेवट गांठत नाहीं ! ती बिचारी अनाथ ! तुमच्याशिवाय तिला आधार नाहीं ! ती प्रेमळ, लाघवी, गोड, हळवी, तरुण, आनंदी; पण तिच्या गुणांची तुम्हांला कदर नाहीं !–चिखलांत चमेलीची कळी पडावी, बहिऱ्यासमोर सतार छेडावी; आंधळ्यापुढं फ्रेंच ब्यूटि उभी राहावी, वेड्यानं गुलकंदाची बर्फी खावी किंवा गाढवाच्या अंगाला कस्तूरीची उटी माखावी, तशी सुधा तुमच्यासारख्या अरसिक नंदीबैलाच्या गळयांत पडली आहे !–तुम्हीं तिच्याकडे पहात नाहीं, मग तिनं माझ्यासारख्या रंगेल गड्याकडे आशेनं पाहिलं, तर तिचा काय अपराध ?–वेड्या तरुणा ! असा जळजळीत नजरेनं माझ्याकडे पाहूं नकोस ! जवळ असलेल्या झाडालाच लता मिठी मारते; लांब असलेल्याकडे ती ढुंकूनही पाहात नाहीं ! समजलांत ?–शांत व्हा, सुरेश ! शांत व्हा आणि हांसत माझ्याकडे पहा !

**सुरेश :** बेशरमपणाची कमाल झाली !–

**( बागेश्री—त्रिताल )**

**॥ जन्मा राक्षस हा आला का ? ॥ अथवा ही कां शंका ? ध्रु० ॥**
**॥ केवि भुले दुसरा कोण निन्द्य पापाच्या पंका ? ॥**

**विभाकर :** सुरेश ! सुधा माझी बहीण आहे बरं ! तिच्याकडे मी भलत्या नजरेनं पाहीन कसं ? पण स्पष्ट आरसा तुमच्यासमोर धरण्याकरितां मला जरा हा आडमार्ग धरावा लागला !–बोला, आतां तरी—

**सुरेश** : काय, सुधा तुमची बहीण आहे ?

**विभाकर** : नुसती बहीण नाहीं, तर आई–माउली–देवता आहे !

**सुरेश** : डॉक्टर ! तर मग मला माफ करा हं !–हें पहा, तुम्ही म्हणतां तें सारं मला पटतं, पण मी तरी काय करूं ? आईपुढं माझं कांहीं चालत नाहीं !

**विभाकर** : मग मी कांहीं तुमच्या हिताचीं कारस्थानं करणार आहें, त्याला तरी तुम्ही संमती द्याल ? सहाय्य नसलं, तरी विरोध केला नाहींत, तरी पुष्कळ झालं !

**सुरेश** : बेलाशक करा ! माझी तुम्हांला पूर्ण संमति आहे ! ( सुधेशिवाय सर्व मंडळी येतात. )

**जगो०** : हा बघा बडा बदमाष ! सुरेशरावांचा खून पाडतो आहे ! मारा ठोका बद्डा सैतानाला !—

**काका** : अरे हरामखोरा ! थांब आतां जांवईबिवई सारं विसरून जाऊन तुला पोलिसाच्या ताब्यांत देतों !

**रमेश** : काका, त्यापेक्षां याला इथंच सोडग्याखालीं बडवूंया !

**भवानी०** : कसा मेला दिसतो आहे पहा, साळसूद सोदा. मेल्याची गाढवावर बसवून धिंड काढली पाहिजे !

**विभाकर** : आणि माझ्या पुढं प्रभावतीला बसवा, म्हणजे छान वरातच होईल ती !

**प्रभावती** : तुमचीच निघूं दे एकट्याची मिरवणूक !–कोणत्या वेळीं कोणतं माणूस काय करील, याचा नियम नाहीं !–आई ! दोन दिवस यांना खोलींत कोंडून घालूंया !

**जगोबा** : नाहीं, ही दोरी आणली आहे. सर्वजण मिळून यांना करकचून जखडूं-या ! हं चला, वेढा ! काका ! धरा कारकूंचा हात !

**सुरेश** : पण हें तुम्ही आरंभलंत काय ? अहो, विभाकर माझा खून करताहेत म्हणून तुम्हांला सांगितलं कुणी ? आम्ही दोघे तर मजेनं गप्पा मारीत बसलों आहोंत !

**काका** : या जगोबानं तर आम्हांला ही भयंकर बातमी दिली !

**जगोबा** : अर्रर्र ! थोडासा घोंटाळा झाला ! काकासाहेब, खुनाची बातमी तर खरीच, पण त्यांत थोडीशी दुरुस्ती केली पाहिजे; जांवईबुवा सुरेशबाबूंचा खून करीत नसून सुरेशबाबूमात्र जांवईबुवांचा खून करायला तयार झाले आहेत !

**रमेश :** मग कांहीं फारसा फरक नाहीं ! बरं आतां मघाच्या साऱ्या शिक्षा दादांना द्यायच्या का ? न्यायानं पाहिलं तर दिल्या पाहिजेत !

**भवानीबाई :** गप्प बैस ! मोठा आला आहे मेला न्यायाचा नरसोबा !

**जगोबा :** भवानीबाई ! तुमचे जांवईबुवा तुमच्या घराण्यांतली एकच मुलगी लाटणारे लाटे गंगाजी नसून, तुमच्या सुनेलाही फूस लावणारे पाजी दिसताहेत !—या कानांनीं गोष्टी ऐकल्या आहेत !—आणि हीच बातमी सांगायला मी आलों होतों. पण विसरून दुसरीच सांगितली !

**प्रभावती :** ऐका, ऐका या भोळया जिवाची साक्ष !

**विभाकर :** हा माझ्यावरचा आरोप साफ खोटा आहे !

**जगोबा :** म्हणजे तुम्ही मला अगदींच भंगट समजतां वाटतं ?

**सुरेश :** हें निव्वळ विभाकरांच्यावर बालंट आहे !

**प्रभावती :** दादा ! दादा ! किती बाईलवेडा झाला आहेस रे तूं ! मेल्या ! तुला दुसऱ्या सुस्वरूप बायका मिळणार नाहींत, अशी कां भीति वाटते ?

**भवानी :** पांचशें लग्नं करूं तुझीं पांचशें, समजलास ?

**जगोबा :** तुम्ही दोघांनीं मिळून मलाच खोटं ठरविलंत ? दम धरा, सुधाताई-नाच घेऊन येतों !

**भवानी० :** अरे ए जगोबा ! तिला ( जातो ) कोंडून घातली आहे !—गेलाच हा !—हा कुठला ऐकायला !

( जगोबा सुधेस घेऊन येतो. )

**जगोबा :** करा आतां खऱ्याखोट्याचा निकाल !

**भवानी :** त्याचा निकाल मघाशींच झाला आहे ! हे जांवई म्हणजे पक्के निगरगट्ठ आहेत ! घरांतून हालत म्हणून नाहींत ! माणसानं तरी करायचं काय ?

**प्रभावती :** तेव्हां त्यांना शिक्षा करण्यापेक्षां हिलाच आपली आठ दिवस उपाशी कोंडून घालावी हें बरं नव्हे का ? कशी फुगली आहे पहा, सरकारी कोठींतल्या घुशीसारखी ! उपासानं अंगावरचं बाळसं उतरलं म्हणजे मग हे फुसलावणीचे प्रकार थोडेतरी बंद पडतील !

**काका :** हो, घराण्याच्या अब्रूकरितां या साऱ्या गोष्टी केल्या पाहिजेत !

**सुरेश :** आई ! हिला तूं आठ दिवस उपास घालणार तर आतां बाजारांतून उपासाचे जिन्नस आणले पाहिजेत ! मणभर रताळीं, दोन मण बटाटे, दश डझन केळीं, धडाभर खजूर, धडाभर तूप......

**रमेश :** दादा ! हा काय उपास कीं, पाहिलवानाचा खुराक हो ?

**प्रभावती :** मेल्यांनो ! आमची चेष्टा करतां कां ?

**भवानीबाई :** चला, हिला आठ दिवस कोंडून घालूंया, म्हणजे ही येईल ताळ्यावर ! ( वेढतात )

**विभाकर :** हां, खबरदार तिच्या अंगाला हात लावाल तर ?

**काका :** जांवईबुवा ! आमच्या सुनेवर हक्क गाजवायचा तुम्हांला काय अधिकार आहे ?

**विभाकर :** देवानं दयाबुद्धीला आणि न्यायनीतीला दुबळ्याविरुद्ध लढण्याचा अधिकार केव्हांच कायमचा देऊन टाकला आहे !

**भवानीबाई :** जास्त चावटपणा कराल, तर घरांतून धक्के मारून.........

**विभाकर :** जायला तयार आहें, पण सुधेला घेऊन !

**प्रभावती :** दादा ! मेल्या ! तूं हिचा नवरा ना ? आणि असा दगडी नंदीप्रमाणं स्वस्थ बसला आहेस ? काय म्हणताहेत बघ ते !

**विभाकर :** आईबापांच्या खोट्या भयानं आपलं कर्तव्य विसरणारा हा शिखंडी कसला हिचा नवरा ?–सुधा ! बोल, तुझी इच्छा काय आहे ? तूं काय करणार ?

**सुधा :** यांनीं कोंडून घातलं तर मी गळफांस लावून मरून जाईन !

**विभाकर :** आणि मग त्यांचा डांगोरा जगभर पिटीन ! –समज, यांनीं तुला कोंडून घातली नाहीं, तरी पण हे तुझा जन्मभर छळ करणार आणि तुझा नवरा तुझ्याकडे ढुंकूनही बघणार नाहीं, यावर तूं काय उपाय काढला आहेस ?

**सुधा :** मी तुमच्याबरोबर येणार !–विभाकर ! मी तुमच्या पायाची दासी होणार !

**जगो० :** ऐका ! कोण खरं न् कोण खोटं तें !

**सुधा :** हे सासुसासरे घडोघडी माझं रक्त पिऊन आपल्या दाढांखालीं माझीं हाडं कडाकड फोडताहेत ! या राक्षसांना काय म्हणून मी देव मानायचं ?–ही नणंद आणि हा दीर ! यमदूतासारखे हात उगारून माझ्या भोंवती उभे आहेत ! यांना म्हणे मी मान द्यायचा !–आणि हे कोण ? भटाभिक्षुकांनीं जबरीनं बनविलेले हे माझे बेजबाबदार, नीरस, नांवाचे नवरे ! घरांतलीं हिंस्र श्वापदं माझ्यावर हल्ला करताहेत, तर माझं रक्षण करायचं सोडून हे भ्याडपणानं मातृपितृ भक्तीच्या भिंतीआड लपताहेत !–प्रेमाचा अमृतप्याला हातांत धरून मी उभी

आहें पण या अरसिकाला तो नको आहे ! आजन्म दासी होऊन यांच्या पायां-खालीं पंचप्राणांचा गालिचा अंथरायला मी तयार आहें, पण हे त्याची पायमल्ली करून पुढं जात आहेत !!–विभाकर ! प्रेमाचे रसिक रंगलाल तुम्हीच आहांत ! तुमच्या सेवेनं दिव्यानंदाचं नंदनवन निर्माण करायला मी आतुर झालें आहें !

**विभाकर :** सुधा ! अशानं तूं माणसांतून उठून जाशील !

**सुधा :** माणसं कसलीं ? जनावरं हीं ! उठले तर जनावरांतून उठून जाईन !

**विभाकर :** तुझी बेअब्रू होईल !

**सुधा :** न्यायनीतीकडे डोळेझांक करणाऱ्या जगाची मी कां पर्वा करावी ? मला माझ्या सुखाकडं पहायचं आहे !

**विभाकर :** ठीक आहे ! तुझा निश्चय असेल, तर मी तुझा स्वीकार करायला तयार आहें !

( सुरेश कंबर खचून बसतो )

**काका :** जांवईबुवा ! काय पाजीपणाची भाषा उच्चारतां ? फौजदारी केस होऊन तुरुंगांत जावं लागेल समजलांत ?

**विभाकर :** या दुबळ्या, प्रेमळ, गोड जिवाकरितां वाटेल ती शिक्षा भोगायला मी तयार आहें ! सरकार एकदां तुरुंगांत टाकील, पण मग ? शिवाय भ्रष्ट झालेल्या सुनेला घेऊन तुम्ही तरी काय करणार ? शेवटीं हें पांखरूं माझ्याकडेच येणार !

**भवानीबाई :** मेल्या ! सुऱ्या ! ऊठ, कंबर खचून काय बसलास ?

**प्रभा० :** दादा ! दादा ! ऊठ ! आपल्या बायकोचा हात धर न् ने तिला आंत लाथाखालीं तुडवीत !

**सुरेश :** तें खरं ग, पण मी हिच्यावर जबरदस्ती कशी करूं !–ही उद्यांतरी पळून जाणारच, त्यापेक्षां आतां डोळ्यांदेखत गेली, तर काळजी तरी नाहीं !

( जातो. )

**काका :** अवदसे ! चल, चालती हो आंत ! नाहींतर उर्मटपणाची वटवट करणारें हें तोंड फोडून टाकतों बघ !

**सुधा :** आतां तुमचं न् माझं नातंच शिल्लक राहिलं नाहीं. मला तुम्ही मेलां नी मी तुम्हांला मेलें ! माझ्या अंगावर हात टाकायचा तुम्हांला काय अधिकार आहे ? चला विभाकर !

**काका :** कशी जाते पाहतों ! वेढा सारीं !

**विभाकर :** शरण आलेल्या या जिवाचं रक्षण करणं हें माझं कर्तव्य आहे. आम्ही जात असतां आम्हांला अडवाल तर एकेकाचा मुडदा पडेल, ध्यानांत ठेवा!

**रमेश :** अरे बापरे! काका, पळा! आई, पळ!

**विभाकर :** घाला, खुशाल हिला कोंडून घाला! आत्तां जातों फौजदार कचेरींत! सारा गांव गोळा करून हिला मोकळी करतों आणि हिची मघांची भाषा, शेंपांचशें लोकांत हिच्या तोंडून वदवितों! हा निघालों पहा! प्यारी सुधा, भिऊं नकोस! आत्तां सोडवितों पहा तुला!

**काका :** अरे बापरे! देवा! काय हा प्रसंग आमच्यावर आणलास? जांवईबुवा! जाऊं नका! जांवईबुवा! डांगोरा पिटूं नका! फौजदार कचेरींत जाऊं नका!

**विभाकर :** जाऊं नको तर काय करूं? तुम्ही माझी बायको माझ्याबरोबर पाठवायला तयार नाहीं; आतां सुधा फिदा आहे, तर तिला तरी मी घेऊन जातों! दोघांचंही काम होईल; मला बायको मिळेल सुधेचाही वनवास संपेल!

**काका :** नाहीं, नाहीं, आतां पुन्हां आम्ही सुधेचा छळ करणार नाहीं! मी देतों हमी, पण हिला माणसांतून उठवून आमचा लौकिक गाजवूं नका!

**विभाकर :** हिचा जाच कमी होत असेल, तर मी हिचा स्वीकार करणार नाहीं! सुधाताई! तुमचं काय म्हणणं आहे?

**सुधा :** हीं म्हणतील तसं वागतील असं मला तरी वाटत नाहीं! तरी पण जर मला या घरांत खरंखुरं सुख मिळत असेल, तर कांहीं मी या आडमार्गावर पाऊल टाकणार नाहीं! याच घरांत सदाचरणानं नि आनंदानं राहीन!

**विभाकर :** यावर तुमचं काय म्हणणं आहे मामी?

**भवानी० :** मी बोलून चालून नतद्रष्ट ठरलेली सासू; मला कशाला विचारतां? हे आहेत कीं, एवढे घरचे पुरुष, त्यांनीं सांगितलं ना?

**विभाकर :** छे छे! तुमचा कबुलीजबाब हवाच; नाहींतर हा निघालों पाहा फौजदार कचेरीकडे!

**काका० :** कबूल कर कीं हेडिंबे! नाहींतर फौजदार कचेरीपर्यंत निघेल ना पोलिसांच्या गराड्यांत तुझी न् माझी वरात!

**भवानी० :** आम्ही सुनेला छळणार नाहीं; पण जांवईबुवांनीं आत्तांच्या आत्तां, एकट्यानं आपल्या घरीं चालतं झालं पाहिजे!

**विभाकर :** नाहीं, तुम्ही सुनेला कसं वागवतां हें पाहाण्याकरितां मला महिना-पंधरा दिवस तरी इथं राहिलंच पाहिजे !–बोला, अटी कबूल आहेत कीं, जाऊं फौजदार कचेरीकडे ?

**काका० :** आहेत आहेत, साऱ्या अटी कबूल आहेत !

**विभाकर :** चला तर हिला घेऊन सुखानं नांदवा आणि घरांत आनंदी आनंद करा !

**प्रभा० :** ( आईस एकीकडे.) आई, विषप्रयोगानं या चांडाळणीला ठार करून या अपमानाचा वचपा काढूं हं ! ही मेल्यावांचून आम्ही सुखी होणार नाहीं !

**भवानी० :** (एकीकडे) प्रभावती ! हिची तिरडी घरांतून निघेल, तेव्हांच आमचा आत्मा शांत होईल ! ( विभाकराशिवाय सर्व जातात; सुरेश प्र. करतो ).

**विभाकर :** एवढ्यानंच आमचं नाटक संपलं आणि एवढ्यानंच सुधाताईचा छळ संपला असं तुम्ही समजूं नका ! याचा पक्का बंदोबस्त होण्याकरितां मुख्यतः प्रभावतीला घरांतून बाहेर काढली पाहिजे. चला, ती कशी काढायची याचा विचार करूं !

**सुरेश :** एकंदरींत तुम्ही खूपच आहांत बुवा ! ( टाळी देतो )

**( अंकाचा पडदा पडतो )**



# अंक २ रा



## प्रवेश १ ला



[ **स्थळः**—दिवाणखाना; पात्रेंः—सुधा प्रवेश करते. ]

**सुधा** : अहो डॉक्टर! अहो डॉक्टर! शुक! ( टाळ्या वाजविते ) इकडे आलांत कां ? इकडे या ! ( विभाकर प्रवेश करतो ) पाहा, मी सांगत होतें, तस्सं झालं ! जगांत कुठें बळजबरीनं स्वभाव पालटले आहेत ? गेले आठ दिवस तुमच्या भीतीनं ही सारी मंडळी आंतून धुसफुसत पण वरून माझ्याशीं थंडपणानं वागत होती; पण आजपासून यांनीं आपलीं मांजरनखं बाहेर काढायला आरंभ केला ! आज पुन्हां घालून पाडून बोलणीं सुरू झालीं!

**विभाकर** : ठीक आहे. धीर धरा, " थोडी उरली कळ सोसावी, घाई ऐशी करूं नका!" आणखी कांहीं तरी उपाय काढूं. बरं, आणखी कांहीं विशेष झालं कीं काय ?

**सुधा** : आज माझ्याकडून सासूबाईनीं खोबऱ्याची रसाळ बर्फी करवून घेतली !–

**विभाकर** : मग मी दिलेली भांगेची वडी त्यांत घातलीत कां ?

**सुधा** : हो, अगदीं कुणालाही न कळवितां चोरून घातली !

**विभाकर** : तुम्ही खाल्ली नाहींत ना ? सुरेशबाबूंना नाहींना दिलीत ?

**सुधा** : छे छे ! परातींत ओतल्यावर तश्शी माजघरांत फडताळांत ठेवून दिली; डॉक्टरसाहेब ! तुमच्या भाविष्याप्रमाणं साऱ्या गोष्टी झाल्या !

**विभाकर** : तें कसं काय ?

**सुधा** : माजघरांत बर्फी ठेवून येतें न तोंच नेहमींच्या रिवाजाप्रमाणं वन्संनीं नी भाऊजींनीं चोरून त्याच्यावर हात मारला ! आतां तो चोरीचा आळ माझ्या-वर येणार !

**विभाकर** : मजा येणार ! मजा येणार ! सुधाताई ! आज बिनतिकिटानं खूप हास्यकारक फार्स पाहायला मिळणार ! ( सुरेश प्र. क. ) या सुरेशबाबू ! आज तुमची प्रियपत्नी तुम्हांला एक अतिशय सुंदर नाटक दाखविणार आहे !

**सुरेश :** त्या नाटकांतलीं बहुतेक पात्रं आमच्या घरचींच असतील ! काय पण एकेकांच्या तऱ्हा आहेत ! पण त्या नाटकाचा आम्हांला कांहीं आगाऊ सुगावा लागेल का ?

**विभाकर :** हो. ( कानांत सांगतो )

**सुरेश :** काय म्हणतां डॉक्टर ? सारं जपून करा हं ! नाहींतर भलतंच होईल ! तुमचा स्वभाव जरा बेडर आहे म्हणून म्हणतों ! बिचाऱ्या सुधेवर नाहींतर भलतंच किटाळ यायचं !

**विभाकर :** त्याची काळजीच नको ! जगांत–पुण्यानं भ्यायचं कारण नाहीं; भ्यावं पापानं वाटेल तर !

**सुधा :** पाहिलंत डॉक्टर ! किती प्रेमळ स्वभाव आहे तो ?—

**( पद चाल : कल्पना कल्पनेविणे; ताल दादर. )**

**अंतरीं गोडशी सुधा । वाहते, प्राशितें; तृप्ति नच कदा ॥ धृ ॥**
**भूवरीच स्वर्ग मिळे; कंठिं पडे सुख सगळें ॥**
**मी शाचि होय; मला इंद्र हे सदा ! ॥**

डॉक्टर, स्वारीला उठतांच स्नानाकरितां गरम पाणी उसपून द्यावं, धोतराच्या चुण्या करून ठेवाव्यात, केशरी गंध तयार करून द्यावं, दोनचार पदार्थ–स्वतः करून पानांत वाढावेत, जेवल्यावर मसाल्याचा विडा करून हातांत द्यावा, पुढें स्वारीची दुपारची वामकुक्षी होत असतांना हांसत थट्टामस्करी करीत एखादी कादंबरी वाचून दाखवावी, स्वारीचा डोळा लागल्यावर हळूच हलक्या पावलीं निघून जाऊन मधल्यावेळीं फराळाचं करावं, संध्याकाळीं स्वारीच्या हातांत हात घालून फिरायला जावं, संध्याकाळचीं जेवणं झाल्यावर मुद्दाम तयार केलेलं चांदीचा–पेलाभर बदामाचं केशरी दूध स्वारीला देऊन चरणसेवा करावी नी ती करीत असतांना स्वारीला गोडशा गाढ झोपेंत गुंगवावं आणि अशा तऱ्हेनं–पाण्याच्या प्रवाहाप्रमाणं चंचल असलेलं हें तारुण्य सार्थकीं लावावं, असं वाटतं; पण यातलं मला कोणी कांहीं करूं देत नाहीं; आणि हे माझे सारे मनोरथ मनांतल्या मनांत वितळून जातात !

**विभकर :** पतिसेवेकरितां तळमळणाऱ्या जिवा ! तुझी तपश्चर्या लवकरच फलद्रूप होईल बरं !

**सुरेश** : ( तिला जवळ घेऊन ) लाडके ! आतां मी खरोखरीच धीट होऊं लागलों आहें. यापुढं तुझ्या सर्व हौशी मी पुरविणार ! लोक हातांत तीर्थ घेऊन प्रतिज्ञा करतात; मी तुझं हें अधरामृत जिव्हेवर धारण करून अशी प्रतिज्ञा करतों—

**सुधा** : हे काय गडे, डॉक्टरांच्या समोर ?

**सुरेश** : अरे हो खरंच ! या गोड गुंगींत वाहात चालल्यामुळं देहभानाबरोबर डॉक्टरांनाही विसरून गेलों होतों ! आपण ब्राह्मणाबरोबर पत्नीचं पाणीग्रहण करतोंच कीं नाहीं ? मग यांच्यासारख्या भूदेवासमोर अधरामृत ग्रहण करायला काय हरकत आहे ?

**विभाकर** : अरे अरे, हें काय ? जरा भीडमर्यादा बाळगा ! मी आहेंना समोर उभा ? अगदींच उल्लूके पट्ठे बनूं नका !

**सुरेश** : यस् ! यदाज्ञापयाति देवः । ( आंतून भवानीबाई )

**भवानी०** : कपाटांतली बर्फी माझ्या परवानगीवांचून कोणी खाल्ली ? नेहमींचाच चोर असेल !

**सुरेश** : अरे बापरे ! आईचाच कडकडाट हा !

**विभाकर** : थांबा, ऐका ! हें लवकरच सुरू होणाऱ्या नाटकाचं मंगलाचरण आहे !

( भवानीबाई प्र. करतात )

**भवानी०** : काय ? तुम्ही इथं आहांत ? हा कारटा इथं आहे ? आणि त्याच्या-जवळ ही अवदसा आहे ?

**विभाकर** : उसाजवळ गोडी, पहिलवानाजवळ जोरजोडी, गवयाजवळ तोडी, बजवैय्याजवळ हातोडी, नावाड्याजवळ होडी आणि माकडाजवळ खोडी हीं असायचींच !

**भवानी०** : दम धरा ! तुमचीच सर्वांची खोड मोडतें ! अवदसे, बर्फी चोरून खातांना गोड वाटली नाहीं ? आतां तुला चांगलीच पळीनं भाजून खरपूस खमंग बनवितें !

**विभाकर** : काय म्हणतां तरी तुम्ही मामी ?

**भवानी०** : नुकतीच केशरी बर्फी करून घरांतल्या फडताळांत ठेवली होती, पण आतां पाहतें तों त्यांतली निम्मी कमी झालेली !

**विभाकर** : मग सुधाताईनंच खाल्ली म्हणून कशावरून ?

**भवानी०** : ही चांडाळीण नेहमींच चोरून खात असते !

**विभाकर** : पण मी म्हणतों—

**भवानी** : मी म्हणतें तें आधीं ऐका ! तुमची वटवट ऐकून घेण्याची मला जरुरी नाहीं !

**विभाकर** : अहो, सुधाताईंना तुम्ही नीट पोटभर जेवायला घालीत नाहीं, तर त्यांनीं चोरून खाऊं नये, तर काय करावं ?

**भवानी०** : काय करावं ? उपाशीं मरावं ! ( सुधेच्या तोंडाचा वास घेतात. ) बघा बघा ! हिच्या तोंडाला केशराचा वास येतो आहे ! चूळ भरायला सुद्धां फुरसत मिळाली नाहीं !

**सुरेश** : आई, मी घेऊं का हिच्या तोंडाचा वास ?

**भवानी०** सुऱ्या ! चावटपणा करूं नकोस ! बाजूला हो ! जांवईबुवा ! घ्या हिच्या तोंडाचा वास आणि करा खात्री आपली !

**विभाकर** : तें असूं द्या पण बर्फी कशी काय साधली आहे ?

**भवानी** : अतिशयच उत्तम ! माल चांगला बनला आहे !

**विभाकर** : कशावरून म्हणतां ?

**भवानी०** : अहो ! मी दोन तुकडे तोंडांत टाकून पाहिले ना ?

**विभाकर** : आतां निकाल बरोबर झाला !–मामी ! अहो, केशराचा वास येतो आहे तो–सुधाताईच्या तोंडाचा नसून तुम्ही खाल्लेल्या बर्फीचा–म्हणजे तुमच्याच तोंडाचा वास तुमच्या नाकाला येतो आहे ! मांजराच्या नाकाला लोणी लावलं असतां तें जसं......

**भवानी०** : चोर कुठली ! चोरून खाते ! दम धर ! आंत पळी तापत घातली आहे, ती आणून चांगली फोडणी देतें ! ( जातात व घेऊन येतात. )

**सुधा** : अगबाई ग ! ( सुरेशला मिठी–मारते )

**भवानी** : काय ? माझ्यासमोर मिठी ? सासूसमोर नवऱ्याला मिठी ? देवा रे देवा ! अशा कशा सुना आवगल्या ? आम्हांला असलं कधीं माहीत नव्हतं !–आतां काय करूं ! नवऱ्याला मिठी मारलीस म्हणून काय झालं ? डागण्या दिल्याशिवाय सोडतें कीं काय ? ( डागण्याचा प्रयत्न करतात; सुरेश आड येतो ) चांडाळणीनं कोड्यांत घातलं ग बाई मला ! हिला डागलं, तर सुऱ्यालाही चटके बसणार !

**विभाकर :** मामी ! या बायका किती ' ह्या ' असतात, याचा आतां मला पुरा अनुभव आला ! ' आमच्या देखत नवऱ्याच्या गळयाला मिठी ' म्हणजे काय ? आतां तुम्ही असं करा; ती पळी माझ्याजवळ द्या; सुनेला लेकापासून ओढून काढा आणि या पळीनं या म्हशीला चांगली डागा !

**भवानी०** आतां तरी मी म्हणतें, त्याचं आलं ना प्रत्यंतर ? ही घ्या पळी ! (देते.) आतां काढतें पहा ओढून या अवदसेला ! ( पदर बांधते )

**विभाकर :** पण मला वाटतं, तुम्हांला ती ऐकणार नाहीं. उपाशीं ठेवतां, तरी भोपळ्यासारखी फुगली आहे ! ही पळी घ्या. मीच काढतों ओढून ! ( तापविलेल्या बाजूनें पळी हातांत देतो; त्या ओरडतात. )

**भवानी०** : अगबाईग ! मेलें मेलें ! डॉक्टर ! काय केलंत हें ? बोलण्याच्या भरांत तापून लाल झालेल्या पळीचा भाग माझ्या हातावर ठेवलांत ! आई ऽ ग ऽ आई ? भडका उडाला हाताचा !

**विभाकर** : अरेरे ! खरंचकी ! कोंवळी, नाजुक कातडी पापडाप्रमाणं भाजून निघाली ! पण एवढं बरं झालं कीं, पळी तापली आहे कीं नाहीं, याची शंका राहिली नाहीं !

**भवानी०** : माझ्याही मरणाची आतां शंका राहिली नाहीं ! ( जगोबा प्र. क. )

**जगोबा :** अरे बापरे ! डॉक्टर ! भवानीबाईची अवस्था कठीण दिसते ! वरच्या माडीवर काका झोंपले आहेत. यांच्या अंतकाळीं ते हजर पाहिजेतच ! आणतों त्यांना ! ( जातो )

**भवानी०** : मी इतकी तडफडतें आहें, पण मेला बायकोला सोडून माझ्या समाचाराला येतो आहे का पाहा !–आई ग !–

**सुरेश :** आई, तूं नेहमीं एकाच सुरांत आणि एकाच तऱ्हेनं बोलत असल्यामुळं रडते आहेस कीं, हांसते आहेस; गुजगोष्टी चालल्या आहेत कीं किंचाळते आहेस, हें कांहींच समजत नाहीं !

( जगोबा काकासाहेबांना घेऊन प्र. करतो, )

**जगोबा :** काकासाहेब ! तोंडांत आधीं गंगोदक घाला ! मी देवांना शिवून बरोबर घेऊन सुद्धां आलों आहें ! एकदां जीव गेला कीं, मग गंगोदकाचा काय उपयोग आहे बरं ?–बघा, नुसता डोळयांत प्राण उरला आहे ! गेली बिचारी ! आतां सुनेला कोण भाजून काढणार ?

**भवानी०** : ( उठून ) मीच मीच भाजून काढणार ! मला मरायला काय झाली आहे धाड ! सर्वांना टाळीन तेव्हांच मी टळेन !

**काका०** : जगोबा ! वाः पूर्ण चौकशी केल्यावांचून असं बडबडायचं ! तुझा साराच उतावीळपणा ! ही तर चांगली खुटखुटीत असून, तोंडांत प्रमाणं खणखणत आहे !

**जगोबा** : पण या मरून भूत झाल्या नसतील कशावरून ?

**काका०** : बस, पुरेकर आपला शहाणपणा !–अग, आठ दिवसांपूर्वी तूं यांना–'सुनेला छळणार नाहीं' म्हणून कबुलीजबाब दिला होतास ना ?

**भवानी०** : बर्फी चोरून खाल्ल्यावरसुद्धां चार शब्दांनीं मी हिला बोलूं नको ? भोगच आला म्हणायचा ! माणसांनीं वागायचं तरी कसं जगांत ? ( आंत किंकाळ्या व हास्य ) अगबाई ! हें कोण ?

**जगोबा** : काका ! भूत ! घर बिघडलं ! खात्रीनं काका भूत ! पण तुम्ही तरी माणसंच आहांत ना ? ( रमेश व प्रभावती ओरडत, हांसत, वेडेचार करीत प्र. क. ) अरे देवारे ! काय हीं भयंकर भुतं ! राम ! राम ! ( काकांना मिठी मारतो ) काका ! राम म्हणा ! काका ! राम म्हणा !!

**काका०** : दूर हो मूर्खा ! या पोरांना आधीं काय झालं आहे तें मला पाहिलं पाहिजे !–बाळांनो ! असं काय करतां ? काय झालं तुम्हांला ? ( दोघे चेष्टा करतात )

**भवानी०** : देवा ! देवा ! पोरांना काय झालं ? अशी कशी पोरांची दुर्दशा झाली ? बाळे प्रभावती, काय झालं तुला ? ( ती किंचाळते ) बाळ रमेश !— ( खदखदां हसतो ) खास, खास यांना कुठंतरी झपाटलंग बाई झपाटलं !

**जगोबा** : माना संभाळा, सर्व मंडळी आपापल्या माना संभाळा ! नाहीं तर हें भूत आमच्याही मानगुटीवर बसण्याचा संभव आहे ! ( दोघेही जातात )

**भवानी०** : खात्रीनं या अवदसेनं कांहींतरी चेटूक केलं असलं पाहिजे ! त्या-वांचून हीं शहाणीं पोरं बिघडलीं कशीं ?

**विभाकर** : आतां मात्र माझी पक्की खात्री झाली ! मामी ! खास तुमच्या सुने-नंच चेटूक केलं असलं पाहिजे ! वरून साध्यासुध्या नी भोळ्या दिसणाऱ्या या पोरी सूड घेण्याकरतां काय करतील याचा नेम नाहीं ! नाहीं तर या मुलांना बिघडायला काय हो कारण होतं ? तसंच हें पहा, या दोघांना शिवूं नका हं ! नाहींतर नुसत्या स्पर्शानंच तुमच्या अंगांतही भुतांचा संचार होईल ! तुमचं झाड कोंवळं आहे म्हणून म्हणतों ! ( मुलें अंगावर येतांच भवानीबाई पळतात व काकासाहेबांना मिठी मारतात. )

**काका०** : बाजूला हो ! भर मंडळींत आतां म्हातारपणीं पोरीसारखी मिठी मारतेस ? असा शिवून कुठें संचार होतो का ?

**विभाकर** : काका, असा संचार होतो, मी प्रत्यक्ष पाहिला आहे ! त्यांतून मामींचा कोंवळा स्वभाव; तुम्हांला एखाद्या वेळीं कांहीं व्हायचं नाहीं; पण जगोबा न् मामी यांचीं हाडं वेगळया प्रकारचीं आहेत ! ( दोघे नाचत येतात व भवानीबाईला स्पर्श करतात )

**भवानी०** : अगबाई ग ! मला कसंसच होऊं लागलं ! मेलें ! मेलें ! ( वेड्या-सारखे करतात व जगोबाला शिवतात )

**जगोबा** : संचार ! संचार ! माझ्याही अंगांत संचार झाला ! ( वेड्यासारखें करतो.)

**काका०** : अरेरे ! अखेरीस आमच्या संसाराचा असा सत्यानाश झाला ना ! आतां या सर्वांना वाडी गाणगापुराकडे नेलं पाहिजे ! पण तोपर्यंत मी तरी शुद्धीवर राहीन याचा काय नियम सांगावा ! आणि हें सारं या चांडाळणीच्या पायांत !–डॉक्टर ! सारीं उठून गेलीं, घराण्याच्या अब्रूची राखरांगोळी झाली तरी हरकत नाहीं ! आतां मात्र हिला घरांत ठेवून घेत नाहीं !–चल, चालती हो माझ्या घरांतून; नाहींतर इथंच तुझा मुडदा पाडतों पहा !

( दंडा घेऊन धांवतात; विभाकर अडवितो )

**विभाकर** : काकासाहेब ! अविचारानं काय करतां हें ? तुम्हांला मुडदेच पाडायचे असतील, तर रमेश प्रभावतीचे पाडा, भवानीमामींचा पाडा ! गरीब बिचाऱ्या सुधेवर काय म्हणून दंडा उगारतां ?

**काका०** : आमची सून चेटकी आहे याबद्दल आतांच तुमची खात्री झाली ना ?

**विभाकर** : कोण म्हणतो असं ? ती एक गंमत केली ! काकासाहेब ! हा रमेश आणि ही प्रभावती, तुम्हां दोघांना चोरून नेहमीं घरांतले जिन्नस चोरून खातात आणि तो चोरीचा आळ सुधेवर घालून तिला मार देववितात ! ती त्यांची चोरी चव्हाट्यावर आणण्याकरितां मीच बर्फींत जालीम भांग मिसळून दिली होती ! ज्यांनीं चोरून बर्फी खाल्ली, त्यांच्या अंगावर ती आली आणि चोर आपोआप उमगला !–बोला, आतां चोर कोण आणि साव कोण ? ( भवानीबाई व जगोबा सावध होतात. )

**काका०** : मग ही आणि तोसुद्धां कसा नाचूं लागला ?

**विभाकर** : ते नुसते भावनेचे खेळ आहेत !–चला, कांहीं वेळानं हीं दोघं शुद्धीवर येतील !–या दोघांना तर शुद्ध आलीच !–चला त्यांना आंत घेऊन ! कांहींतरी औषधोपचार करून यांना ताळ्यावर आणूंया ! (दोघांना धरून आंत नेतात.)

**जगोबा०** : मी आतां शुद्धीवर आलों आहें !–काका, काकूंना उचलून आंत नेऊं या ! तुम्ही धरा पाय; मी धरतों डोकं !

**भवानी०** : खबरदार माझ्या अंगाला कोणी हात लावाल तर !

**काका०** : शुद्धीवर आलीस यांत मला बरं वाटलं ! (जगोबासह जातात.)

**भवानी०** : मेल्या ! जांवयाच्या रूपानं आलेल्या वैऱ्या ! या भवानीचा तडाखा दाखवीन बरं कां कधीं तरी ! चांडाळा ! आमची अशी फटफजिती केलीस ? (जातात.)

**विभाकर** : अहाहा ! हा सासूबाईंचा तडफडाट पाहून मला कशा आनंदाच्या गुदगुल्या होताहेत !–सुधाताई ! आज दुस्मानांची दाणादाण उडून तुम्हांला विजय मिळाला, याबद्दल आम्हांला काय बक्षीस देणार ?

**सुधा०** : गृहराज्याची मी खरीखुरी सम्राज्ञी झालें कीं, मग मी माझ्या हातानं तुम्हाला "रोजसेंटचा—मोतीया" भात करून घालीन !

**विभाकर** : छे छे ! तो लांबचा वायदा नको ! आजच्या आज–आत्तांच्या आत्तां आम्हांला मेजवानी मिळाली पाहिजे !

**सुरेश** : आज तिच्या हातांत काय आहे बरं, विभाकर ? बिचारा परतंत्र जीव हा !

**विभाकर** : तिच्या हातांत कांहीं नसलं तरी, तिच्या गळ्यांत कांहीं आहे खास ! आज आम्हांला एक गोडसं गाणं म्हणून दाखवा !

**सुधा** : अगबाई !—

**विभाकर** ; भिऊं नका ! हीं पहा दारं लावून घेतलीं आम्हीं. आतां कोणीही येणार नाहीं !–

**सुरेश** : म्हण ना, असं काय करतेस ?–खरंच तूं गाणीं चांगलीं गातेस म्हणे. आतांपर्यंत चाललेल्या ताशाच्या कडकडाटानं कान कसे त्रासून गेले आहेत; आतां आपल्या गोडशा बांसरीनं—

**सुधा** : म्हणतें, म्हणतें ! इतकी कांहीं विनवणी करायला नको ?–

**पद–चाल–हृदया प्रिया**

**अजि ऐकवा निज बांसरी ॥**
**दुजी आस मनि नुरली श्रीहरी ! ॥ ध्रु० ॥**
**मुरली हृदीं कां मधु गान-गंगा ॥**
**कमती सुधा कां रंगेल रंगा ! ॥**
**फुलवा तृषायुक्त मृदु वल्लरी ॥**
**खुलवा अति होय मति बावरी ॥**

**विभा०** : शाबास ! याचं नांव गळा ! नाहींतर आमचा नुसता मुका बगळाच ! ( पडदा. )

---

## प्रवेश २ रा

[ **स्थळ** : घरांतील एक बाजू; पात्रें : जगोबा व भवानीबाई ]

**भवा०** : जगोबा ! तुमच्यासारखा माणूस व्हायचा नाहीं बरं ! किती इमानी, किती हुषार नी किती धोरणी तुम्ही !

**जगोबा** : मग मी काय सांगतों आहें ? पण या घरांत माझं कुणी ऐकेल तर शपथ ! इथं सारींच शहाणीं ! मी आचारी म्हणून मला कमी समजूं नका ! आम्ही चुलीला आग लावतों, पण जगाच्या पोटाची आग विझवितों, भाकरी थोपटतों नी वेळेला पाठही थोपटतों ! जशा पोळ्या लाटतों, तसेंच स्वयंपाक घरांतले उरले सुरलेले पदार्थही लाटतों; लाडू वळतों तशीच शत्रूंची गठडीही वळतों ! पापड भाजतों न् दुस्मानालाही भाजून काढतों ! कुठंही न शिजणारी डाळ आमच्या जवळ शिजते ! आम्ही जगाचे अन्नदाते ! आमच्यावरच जगाचं आरोग्य अवलंबून ! आम्हीं धुरांत धुरकटतों, राखेंत काळवंडतों, शेणांत मळतों, विस्तवांत होरपळतों, पण जगाचा अंतरात्मा शांत करतों ! असे आम्हीं–

**भवानी०** : जगोबा ! आतां तुमच्या आशेंत राहायचं मी ठरविलं आहे ! तुमची योग्यता मला आत्तांपर्यंत कळली नव्हती. बरं ! तुम्ही सांगा, मी सुनेला रीतभात शिकवितें, यांत माझं चुकतं कां ?

**जगोबा** : छे छे ! तुमच्या सारखी प्रेमळ माऊली मिळायची नाहीं; सुधाताईचं नशीब म्हणून त्यांना असली सासू मिळाली; पण त्यांना कुठं त्याची किंमत आहे ?

**भवानी०** : आतां कसं बोललांत ? या सुनेशीं कसं वागावं, याचं मला एक कोडंच पडलं आहे !

**जगोबा** : हो खरंच. घराबाहेर हांकलून द्यावी तर, कुणाचा तरी हात धरून जाणार आणि कुळाला बट्टा लावणार; बरं घरीं ठेवून घ्यावी तर, तुम्हां सर्वांना छळीत बसणार !

**भवानी०** : नाहीं, ही एखाद्या वेळीं आमच्या प्राणांवरसुद्धां उठायची !

**जगोबा** : अगदीं खरं आहे ! त्याच्या आधीं आपणच हिच्या प्राणांवर उठलें तर ?

**भवानी०** : जगोबा ! जगोबा ! कसं अगदीं माझ्या मनांतलं बोललांत हो !

**जगोबा** : म्हणजे ! तुम्ही खरंच सुनेला विष घालणार कीं काय ?

**भवानी०** : ( पाय धरून ) जगोबा ! तुम्ही सत्पात्र ब्राह्मण आहांत, तुमच्या जवळ हृद्गत बोलूं नको तर कुणाजवळ बोलूं ? आज घराण्याची अब्रू राखून सर्वांना सुखी करणं तुमच्या हातांत आहे ! समजा, आपण घरांत शिरलेली नागीण ठार करून सर्वांना निर्भय करीत नाहीं का ? तुमच्याजवळ जालीम विषाचा संग्रह असतो......

**जगोबा** : हो, केव्हां आत्महत्त्या करावी लागेल याचा नियम नाहीं म्हणून एक दोन प्रकारचीं विषं मी नेहमीं जवळ बाळगीत असतों !

**भवानी०** : तर त्यांतलं चिमुटभर विष उपयोगांत आणलंत तर, सर्वांचं कल्याण होणार आहे ! जगोबा ! करतां कां एवढी कृपा ? तुम्ही 'होय' म्हणून आश्वासन दिल्यावांचून मी हे पाय सोडणार नाहीं !

**जगोबा** : हो; भल्याकरतां बुरं काम करायला हरकत नाहीं ! पण मग तुम्ही माझ्यावर उलटणार नाहींना ?

**भवानी०** : देवाची शपथ, नाहीं हो उलटणार ! मग कसं करतां सांगा !

**जगोबा** : तुम्हीच सांगा कसं करूं ?

**भवानी०** : तुमच्या विषाला कांहीं चव आहे का ?

**जगोबा** : एकाला आहे, दुसऱ्याला मुळींच नाहीं !

**भवानी०** : तर मग मी तुम्हाला पेढे आणून देतें; त्यांना दाभणानं भोंक पाडून प्राणजाण्याइतकं बिनचवीचं विष आंत भरा आणि भोंक बंद करून ते पेढे सुनेला द्या ! घरांत सर्वांनाच पेढे वांटा; पण ओळखतां यावेत म्हणून विषाच्या

पेढ्यावर वेलदोड्याचे दाणे चिकटवून ते सुनेला द्या. आम्ही दिले तर, सुनेला संशय येईल; तुमचा मात्र येणार नाहीं ! मग करतां ना येवढं ?

**जगोबा :** हो हो ! त्याची काळजीच नको !

**भवानी० :** अगदीं शपथ ?

**जगोबा :** हे पहा, तुमच्या गळ्याची शपथ ! मग झालं कीं नाहीं ?

**भवानी० :** एवढं काम केलंत तर तुमच्या हातांत सोन्याचीं सलकडीं घालीन बरं !– पेढे आणायला पाठवितेंच !–रम्या ! अरे रम्या !–( जातात; विभाकर प्र. क.)

**जगोबा :** या, वेळेवर आलांत ! ( कानांत ) अशी–गंमत झाली ! भवानीबाईंना आज मी चांगलंच बनवलं आहे !

**विभाकर :** छान केलंत ! हा योगायोग चांगलाच जमून आला ! आतां आपण याचा योग्य फायदा घेतला पाहिजे ! तर मग आतां असं करा, विषाबद्दल मी देतों तें औषध पेढ्यांत घाला आणि मोठ्या शिताफीनं ते पेढे सुधाताईंना न देतां प्रभावतीला द्या !

**जगोबा :** म्हणजे प्रभावतीताईंना तुम्ही मारणार कीं काय ?

**विभा० :** छे छे ! ते पेढे प्रभावतीच्या पोटांत जातांच, दोनतीन तास तिच्या अंगाचा नुसता भडका उडेल ! ती मरणार नाहीं, पण तो उडाला कीं, सुधाताईचा संसार सुखाचा झालाच म्हणून समजा !–मी सांगतों त्याप्रमाणं तुम्ही करा आणि नुसती गंमत पाहात राहा !

**जगोबा :** पण मला तुम्ही तोंडघशी पाडणार नाहीं ना ?

**विभा० :** त्याची काळजीच नको ! प्रभावतीच्या अंगाची तलखी होऊं लागली कीं सांगा, ते विषाचे पेढे चुकून सुधाताईऐवजीं प्रभाताईच्या पोटांत गेले म्हणून ! मग मी काय करायचं तें करतों !

**जगो० :** ठीक ठीक ! छान छान ! उत्तम ! वेल ! खासं ! एक्सलंट ! खोड मोडा या सैतानी टोळीची चांगली !

**विभा० :** चला, आपण दुसरीकडे जाऊन या विषयाची वाटाघाट करून, कसं बोलायचं, कसा अभिनय करायचा, काय काय करायचं, तें सारं पक्कं ठरवूं. या ! ( जातात. )

---

## प्रवेश ३ रा

[ **स्थळः**—दिवाणखाना; **पात्रें**—सुरेश व सुधा ]

**सुरेश** : अहो ! गृहराज्यांतले बंडखोर चळवळे ! आम्हांला पाहून असं पळूं नका ! या तुमच्या चळवळीला लवकरच यश येऊन तुम्हांला स्वराज्य मिळणार आहे !

**सुधा** : नको, जातेंच मीं. आजुबाजूला मंडळी वावरताहेत ! कांहींतरी गोंधळ उडायचा आणखीं !

**सुरेश** : अहो या !–मी सांगतों ना ! मी आतां पूर्वीचा पोचट सुरेश राहिलों नाहीं. विभाकरांनीं धाडसाचे डोज पाजल्यामुळें मी थोडा थोडा शूर बनत चाललों आहें. या ! ( ती थोडी थोडी जवळ येते. ) या आणखीं एक पाऊल ! हं, अस्सं ! आतां अगदीं थोडं अंतर राहिलं ! या !—

**सुधा** : हें काय असं गडे ? माणसानं कसं मर्यादेंत असावं; ही का नवराबायकोनीं बोलण्याची जागा ? चवाठ्यावरची धर्मशाळाच ही !

**सुरेश** : बस्स ! घरांत तरुण–तरुणीचं राज्य सुरू झालं कीं, त्या घरांतल्या झाडून साऱ्या म्हाताऱ्या मंडळींनीं तीर्थयात्रेला जावं किंवा त्या तरुण नवराबायकोंना तरी स्वतंत्र वातावरणांतल्या स्वतंत्र रंगमहालांत ठेवावं, असं मी लेजिस्लेटिव असेंब्लीमधें बिल आणणार आहें ! हा काय त्रास ! घरच्या म्हाताऱ्या मंडळींचा अपमान होतो, म्हणून म्हणे आम्ही दोघांनीं त्यांच्यादेखत एकमेकांशीं बोलायचं नाहीं, चालायचं नाहीं, पाहायचं नाहीं, हंसायचं नाहीं; केवढा जुल्म हा ! सूर्याला पाहतांच कमलिनी प्रफुल्लित होते, चंद्राला पाहतांच कुमुदिनी हांसते, त्या वेळीं ती आजुबाजूला पाहाते का ? ( तिला जवळ घेऊन ) आणि म्हणे, या मूर्तिमंत सौंदर्यानं, वडील मंडळी पाहातात म्हणून खालीं मान घालून कोमजलेल्या स्थितींत वावरायचं !

**सुधा** : मग आपलं म्हणणं तरी काय आहे ? सर्व मंडळींच्या देखत कां मी आपल्या गळ्यांत पडून निर्लज्ज होऊं !

**सुरेश** : माझ्या जवळ तरी बैस. मग सांगतों काय तें ! ( बसते. ) तूं म्हणे कविता करतेस ! आम्हांला कळविलं नाहींस आतांपर्यंत ? म्हण पाहूं एखादी !

**सुधा** : कसली कविता ! कांहीं तरी ‘ ट ’ ला ‘ ट, ’ ‘ प ’ ला ‘ प ’ जुळवितें झालं ! आम्हा बायकांच्या कसल्या कविता ?

**सुरेश :** बायका झाल्या म्हणून काय त्या माणूस नाहींत ? देवि सरोजिनी, संजीवनी मराठे प्रतिभाशाली कविता करीत नाहींत ? तशीच सौभाग्यवती सुधा ! तुझी कविता तुझ्या मुखांतून ऐकल्याशिवाय मी तुला सोडणार नाहीं !

**सुधा :** न म्हणावी तर असा सत्याग्रह होणार, बरं म्हणावी तर मंडळी गोळा होणार !– दुसरीकडे खोलींत एकांतीं तरी म्हणतें !

**सुरेश :** छे ! या चव्हाट्यावरच म्हटली पाहिजे ! हं म्हण ! म्हण !—

**[ चाल बिचारी अनाथ० ताल–केरवा ]**
**॥ प्रेमपंकजाची माला, अर्पितें प्रियाला ॥**
**बांधुनीच ठेवा याला, प्रार्थना पदाला ! ॥धृ ॥**
**सुवासें सख्याच्या मनाला तोष कां झाला ॥**
**तरी या सखीचा बिचारा जीव हा धाला ! ॥**

[ काकासाहेब, प्रभावती प्रवेश करतात; सुधा पद बंद करते; मंडळी सुरेशला दिसत नाहींत )

**सुरेश :** म्हण; अशी दचकलीस कां ? अहाहा ! किती गोड कविता ही ! जसा कांहीं अमृताचा झराच ! म्हण, कुणाच्याही बापाला भ्यायचं तुला कारण नाहीं !

**काका० :** तुझ्या बापाला प्रत्येकानं या घरांत भ्यालंच पाहिजे ! वा:, वरून साळसूद दिसतोस, पण एकंदरींत खूपच सैतान आहेस, म्हणायचा !

**प्रभावती :** काका, हा असा सारखा घरांत चावटपणा चाललेला असतो ! असले प्रकार पाहून–कुणाचं डोकं फिरून जाणार नाहीं ? अपमान तरी किती गिळायचा ? दिवसाढवळ्या चव्हाट्यावर बसून नि एकमेकांच्या गळ्यांत गळे घालून, गळा काढून गाणीं गायचीं म्हणजे काय ?

**सुरेश :** पण इथं राहायला तुला सांगितलं आहे कुणी ? सासरीं-नवऱ्याच्या घरीं जा की ! स्वतःचा संसार तुला आवडत नाहीं आणि माझा बघवत नाहीं, असं कां ?

**काका० :** हां खबरदार, तिला असं बोलशील तर ! माझा जिवमान असे-पर्यंत तिच्याविरुद्ध मी कुणाला कांहीं करूं देणार नाहीं !

**सुरेश :** काका, मग हे खटके टाळण्याकरितां आम्हांला स्वतंत्रच बिऱ्हाड करून द्यानांत !—

**प्रभावती :** तरुणपणीं पोरी अशा स्वतंत्र झाल्यावर त्यांना घरची रीतभात कशी लागायची ?

**सुरेश** : किंवा तुम्ही तरी सारीं तीर्थयात्रेला चला !

**काका०** : अरे चोरा ! असा धीट केव्हांपासून झालास ? जांवईबुवांनींच . तुझं डोकं बिघडविलेलं दिसतं !

**प्रभावती** : काका, दादा असं कधीं पूर्वी बोलत होता का ? त्यांना घालविल्या-वांचून हा न् ही सुधारायचीं नाहींत !

**काका०** : करतोंच आतां हकालपट्टी जांवईबुवांची !–सुऱ्या ! चल, चालता हो आपल्या कामाला आणि ए अवदसे ! चल, चालती हो स्वयंपाक घरांत ! पुन्हां गाणीं म्हणाल, तर या सोडग्यानं त्याचीं रडगाणीं बनवीन, समजलांत ! जातेस कीं नाहीं ? ( सुधा जाते. ) चल रे शंख्या ! ( त्याला घेऊन जातात; प्रभावती जाऊं लागते; इतक्यांत विभाकर येऊन तिचा हात धरतो. )

**विभाकर** : आहाहा ! किती कोमल हात हा ! जसं कांहीं गुलाबाचं फूलच ! जसा रंगदार, तसाच सुवासिक ! जसा मोहक तसाच मकरंदाप्रमाणं मधुर !
( हाताचें चुंबन घेतो. )

**प्रभावती** : चला, बाजूला व्हा ! सोडा मला ! हा काय चावटपणा ? नाहींतर चांगली तोंडांत भडकावीन पहा !

**विभाकर** : मग माझी गुलाबाची उपमा चुकली नाहीं म्हणायची ! गुलाबाला कांटे असतात, तर तुझा हातही कांट्याप्रमाणंच तिखट आहे ! तुझा हात माझ्या श्रीमुखांत बसून त्याच्या तडाख्यानं माझ्या गालांतून रक्ताचें कारंजें उडण्याचं माझं भाग्य आहे का ! रंगमहालांत, एकांतीं, प्रेमानं रंगलेल्या रमणानं, रमणीच्या लाल ओंठावर आपले ओंठ ठेवतांच तिच्या गालावर लज्जेची लाली एकदम उधळली जाते; पण प्रियतमेनं–श्रीमुख भग्न केल्यामुळं प्रियकर रक्तानं नाहात आहे, असं उदाहरण आपलंच होणार ! लाडके ! सांग, तूं असं केव्हां करणार ?

**प्रभावती** : निर्लज्जपणाचा कळस झाला ! असा लघळपणा केला, म्हणजे मी तुमच्याबरोबर येईन, असं मात्र समजूं नका ! मला तुमच्या घरीं नांदायला यायचं नाहीं !

**विभावरी** : तूं माझ्या घरीं आलीस कीं, माझं घर ' माझं ' असं राहणारच नाहीं ! तें तूंच बळकवणार आणि तूंच त्याची स्वामिनी होणार !

**प्रभावती** : एक मिनीटभरही मी तुमची सेवा करणार नाहीं !

**विभाकर** : एक मिनीटभरही करूं नकोस ! हा बंदा नोकर चोवीस तास तुझ्या पायाची चाकरी करायला तयार आहे !

**प्रभावती** : मला बळजबरीनं घरीं नेलीत, तरी मी अन्न शिजविणार नाहीं कीं, घरकाम करणार नाहीं; सांगून ठेवतें !

**विभाकर** : तुझे सुंदर सद्गुण आणि तुझं मोहक सौंदर्य यांनीं मला मोह घातल्यावर जेवणाखाणाची शुद्ध राहाणार आहे कुणाला ? शिवाय स्वयंपाक न शिजल्याकारणानं घर न् तब्येत कशी साफ राहील !

**प्रभावती** : मी एक थेंबही पाणी आणणार नाहीं ! तहानेनं तस्सं तुम्हांला तडफडावं लागेल !

**विभाकर** : तुझ्या डोळ्यांत चमकदार पाणी भरलं आहे; तूं तर स्वतःच पाणीदार आहेस; तुला उसनं पाणी घेऊन काय करावयाचं आहे ? आणि मी तुझं पाणिग्रहण केलं असल्यामुळं मला तर त्या पाण्याची मुळींच जरुरी नाहीं !

**प्रभावती** : तुमची झोंपमोड करून तुम्हांला त्रास देईन; वेड लावीन; एक पळभरही विश्रांति मिळूं देणार नाहीं !

**विभाकर** : विश्रांति घ्यायची नाहींच मुळीं ! आणि तूं जवळ असतांना झोंप कुणाला येणार ? आणि वेडा तर मी आतांच झालों आहें !

**प्रभावती** : कस्सं बोला, हे आपला मुद्दा कांहीं सोडीत नाहींत ! मला जर तिकडे राहायला यायचं नाहीं, तर तुमचा तरी एवढा अट्टाहास कां ? मला सासुसासऱ्याच्या हाताखालीं नांदायचं नाहीं !

**विभाकर** : खरं सांग हं, मी तुला पाहिजे ना ? बोल, लाडके, बोल !

**प्रभावती** : मला कांहीं विचारूं नका ! मी कांहींही उत्तर देणार नाहीं !

**विभाकर** : शब्दानं देऊं नकोस; मानेनं दे; डोळ्यानं दे; गालांनीं दे !

**प्रभावती** : मला तिकडे नेऊन तुम्ही कसे सुखी होणार ? रोजच्या रोज खटके उडतील समजलांत ?

**विभाकर** : खटके तर उडालेच पाहिजेत; त्याशिवाय मजा नाहीं ! गारगोटीवर गारगोटी आपटली कीं, ठिणगी उडते आणि किती चमकदार दिसते; तशी चमक संसारांत पाहिजे !

**प्रभावती** : तुम्ही खूप समजून ठेवा, मी तुमच्या अंगावर हातही टाकायला कमी करणार नाहीं ! मी इतर चारचौघींसारखी गरीब गाय नव्हे, उमजलांत !

**विभाकर :** बेशक ! बेशक ! चाबकांनीं पाठ फुलीव; दंडुक्यानं डोकं फोड; दगडांनीं हातपाय मोड; मुसळानं दांत घशांत घाल; ही सर्व प्रेमाची सेवा करून घ्यायला हा नंदीबैल एका पायावर आनंदानं तयार आहे ! तूं काय वाटेल तें कर, पण तुझ्या मृदु हाताचा एकदां स्पर्श या शरीराला होऊंद्या ! इतकंच काय, पण या तुझ्या प्रियपतीला विषप्रयोगानं, सुरीनं, जळक्या लाकडानं ठार मारलंस तरी त्याला माझी तयारी आहे ! बस ! मरावं, तर तुझ्यासारख्या प्रेमळ, सरळ, कोमल, मधुर सुंदरीच्या हातूनच मरावं ! पण फक्त एकच अट, मरायच्या आधीं फक्त एकवार या अधरामृताचा प्याला या ओठांना लागला पाहिजे !– ( धरतो. )

**प्रभावती :** व्हा, बाजूला व्हा ! हा काय मेला निलाजरेपणा ! दिवसाढवळ्या राजरोस, चारचौघांत हें काय हें ! आई ! ए आई ! पाहिलंस का हें !

**भवानी० :** ( प्र. करून ) अग, यजमान जवळ आले, तर असं किंचाळायला काय झालं ? भारीच बाई तूं ! जवळ उभी होतीस, तर कशी श्रीविष्णुजवळ उभ्या असलेल्या लक्ष्मीसारखी दिसत होतीस !

**विभाकर :** साध्या लक्ष्मीसारखी नव्हे; कडकलक्ष्मीसारखी !

**प्रभावती :** नुसते आग्यावेताळ आहांत ! ( चडफडत जाते ).

**भवानी० :** जरा अल्लड आहे; बाकी तशी कांहीं प्रभा हाडाची वाईट नाहीं !

**विभाकर :** छे छे ! प्रभावतीसारखी सद्गुणी, प्रेमळ, नम्र आणि गोड मुलगी मिळायची नाहीं ! यामुळेंच तर ती मला माझ्या जिवापेक्षांही प्रिय झाली आहे. ( जगोबा पेढे घेऊन प्र, करितो. )

**जगोबा :** हे पेढे !

**विभाकर :** हे पेढे कसले ?

**जगोबा :** भवानीबाईच्या चुलत चुलत पुतणीच्या, भाचेजांवयाचा, मुख्य ऑफीसर आहे ना ? त्याच्या हेडकारकुनाच्या, पट्टेवाल्याच्या, मुलीच्या, दिराच्या म्हशीला रेडा झाला म्हणून हे पेढे ! अहो, विचारतां काय ? मुकाट्यानं खा म्हणजे झालं ! यांचा कांहीं नवस होता, त्याचे आहेत हे !

**विभाकर :** ( हळूच ) प्रभावतीनं औषधाचे पेढे खाल्ले का ?

**जगोबा :** ( हळूच ) हो, ते खाल्लेले पाहूनच मी इकडे आलों ! ( मोठ्यानें ) काकू ! तुम्हीही हा एक पेढा तोंडांत टाका ! ( देतो. )

**भवानी** : ( हळूच ) सुधेनं विषाचे पेढे खाल्ले का ?

**जगोबा** : ( हळूच ) हो, सुधा कांहीं आतां खात्रीनं जगत नाहीं ! ( रमेश घाबऱ्या घाबऱ्या प्र. करतो. )

**रमेश** : आई ! आई ! पेढे खाल्ल्यापासून आका कसं करूं लागली आहे पाहा ग ! तिच्या पोटांत विस्तव पेटल्याप्रमाणं भडका उडाला आहे ! आणि ती डोळे पांढरे करूं लागली आहे ! एकाएकीं असं होऊं लागलं ! आम्ही पेढे खाल्ले, वहिनींनी खाल्ले, पण कुणालाच कांहीं झालं नाहीं; आका मात्र कसंतरीच करूं लागली आहे !

**भवानी०** : काय ? पेढे खाल्ल्यापासून सुधा शाबूत आहे, पण प्रभा घाबरीघुबरी झाली आहे ? अरे देवारे ! जगोबा ! जगोबा ! कांहीं घोंटाळा केला नाहींत ना ?

**जगोबा** : कांहीं नाहीं ! साऱ्या सरळच गोष्टी झाल्या आहेत !

**रमेश** : आई ! ते पाहा, सर्वजण अत्यवस्थ आकाला इकडेच घेऊन येताहेत ! ( जातो; काका, सुरेश, रमेश व सुधा प्रभावतीला घेऊन येतात व बिछान्यावर निजवितात. )

**प्रभावती** : आग ! आई ! आऽग ! अंगाची सारखी तलखी, भडका होतो आहे ! मला बिछान्यावर निजविलं आहे कीं, आगीच्या खाईत ढकलून दिलं आहे ?- पाणी ! पाणी !- मला नदींत नेऊन तरी बुडवा ! हाय !—

**काका०** : पाणी तरी किती प्यायला द्यायचं ! तांब्याभर तरी पोटांत गेलं असेल !

**भवानी०** : बाळ, असं काय करतेस ? उष्णता वाढली असेल; नाहींतर आणखीं कांहींतरी झालं असेल ! लवकर उतारा पडेल. असं काय बरं ? माणसानं धीर धरावा तो !

**प्रभावती** : नाहींग, आई, ही आग सहन नाहीं करवत ! ही बहुतकरून अंतकाळाची भट्टी पेटलेली दिसते !

**सुरेश** : ताई, असं काय बरं अशुभ बोलतेस ? कांहीं तरी औषधोउपचार करून आगंतुक संकटाला हुसकून लावूं !

**सुधा** : वन्सं, असं तुम्ही भलतंच बोलूं लागलांत, तर बाकीची मंडळी घाबरून नाहीं का जात !

**भवानी०** : कळलं ! पुरे कर तुझं बोलणं ! ढोंगी कुठली ! नणंद तडफडत आहे हें पाहून तुला आनंदाच्या उकळ्याच येत असतील ! पण वरून सोंग पाहा कसं घाबऱ्याचं करते आहे ती !

**काका०** : आतां या वेळीं तरी तुमचीं भांडणं जरा बाजूला ठेवा ना ! कांहीं काळवेळ कळतो कीं नाहीं तुम्हांला !

**प्रभावती** : आग आग ! माझ्या अंगावर बर्फाच्या विटातरी ठेवा !

**विभाकर** : तुम्हा सर्वांची परवानगी होत असेल, तर मी प्रभावतीला तपासायला तयार आहें !

**काका०** : खुशाल, खुशाल तपासा ! घरच्या डॉक्टरासारखी काळजी बाहेरच्याला कधीं तरी वाटेल ?

**विभाकर** : पण त्या बरोबर रोग्याचीही—अनुमती पाहिजे !

**प्रभावती** ; तपासा ! कांहीं तरी औषध द्या, पण या हालांतून माझी सुटका करा ! आग ! तलखी ! भडका ! डोंबाळा उडाला !!

**विभाकर** : ठीक आहे ! ( तपासतो. ) अरेरे ! काय पाहातों मीं हें ! वरुन तिखट आणि तापट, पण आंत साखरे प्रमाणं गोड असलेल्या या माझ्या लाडकी-बरोबर मी गंमतीचा संसार करीन अशी आशा मी बाळगून बसलों होतों; पण अखेर आकाशाची कुऱ्हाड कोसळून त्या आशेचे तुकडे तुकडे झाले ना !

**काका०** : काय ? काय ? झालं आहे तरी काय हिला, जांवईबुवा !

**विभाकर** : पांचदहा मिनिटांपूर्वी हिच्या पोटांत कुचला, अफू, बचनाग वगैरे पांचसहा विषांचं मिक्श्चर गेलं असलं पाहिजे ! आतां ही अवघी दोन तासांची सोबती आहे !

**प्रभावती०** : काय माझ्या पोटांत वीष गेलं असून मी दोन तासांचीच सोबती ?– आई ! काका ! आतां माझं कसं होणार ? मला जगवा ! काय वाटेल तें करून मला जगवा !–दादा ! इकडचं जग तिकडे कर, पण मला जगीव रे बाबा ! माझं अजून कांहींसुद्धां झालं नाहीं !!

**काका०** : बाळे, कसंग तुझ्या पोटांत विष गेलं ? तूंच नाहींना आत्महत्त्या करावी म्हणून खाल्लंस ?

**प्रभावती** : नाहीं हो, काका, मी होऊन मरेन कशी ?

**भवानी०** : मग बाळे, हें असं झालं कसं ?

**सुरेश** : ताई ! ताई ! आमच्या डोळ्यांदेखत निघालीस ना ?

**जगोबा** : आतां कोडं उलगडलं ! सुधाताईंना चारायचे विषाचे पेढे चुकून प्रभाताईच्या पोटांत गेले खास ! कारण तें विष पोटांत गेलं कीं, हीं अशींच लक्षणं होतात !

**भवानी०** : चांडाळा ! जग्या ! काय घोटाळा केलास हा ! तुझ्यासारख्या महा-मूर्खाच्या अंगावर हें मी सोपविलं हा माझाच गाढवपणा झाला !

**विभाकर** : जगोबा ! यांत तुझाच कांहींतरी पाजीपणा दिसतो आहे ! खरं सांग, काय आहे तें ! नाहींतर तुला पोलीसच्या ताब्यांत देऊन, तुझ्या पाठीचीं चामडी लोळवितों !

**भवानी०** : चल ! चालता हो इथून ! कशाला इथं उभा राहिला आहेस बावळटासारखा ! चल जा ! ( तो जाऊं लागतो. )

**विभाकर** : जगोबा ! इकडे ये ! ( तो येतो. ) सांगतोस कीं नाहीं ?

**जगोबा** : या भवानीबाईंच्या मनांत आपल्या सुनेला जिवानिशीं मारायची होती. त्याकरितां त्यांनीं माझ्याजवळ विष मागितलं; मी दिलं, तें या पेढ्यांत घातलं आणि पेढे वाटण्याची कामगिरी माझ्यावर सोपविली, मी गडबडींत सुधाताईंना द्यायचे पेढे–विसरून प्रभाताईंना दिले, प्रभाताईंना आमचं कारस्थान माहीत नसल्यामुळं त्यांनीं ते खाल्ले, त्याला मी काय करूं ?

**प्रभावती** : काय, शेवटीं मी मरायला माझी आईच कारण झाली ? आई ! आई ! चांडाळणी ? काय केलंस हें ? मला जन्म दिलास, पण शेवटीं मृत्यूही तूंच दिलास ? ( रडते )

**काका०** : घराचं स्मशान बनविणाऱ्या हडळी ! आतां तुलाही टार करतों ! करावं तसं भरावं ! ( भवानीबाईंस मारण्यास धांवतात. )

**विभाकर** : काकासाहेब ! हात आवरा ! यांच्याबरोबर तुम्हीही अविचार करूं नका ! मी आल्याबरोबर तुम्हांला सांगितलं नव्हतं कीं, या अविचारी, मूर्ख बायकांच्या पायांत तुम्हांला ढळढळां रडण्याचा प्रसंग येणार आहे म्हणून ? तो प्रसंग दुर्दैवानें आतां आला आहे ! जरा बावळटपणा सोडून बायकांना आवरलं असतंत, तर तुमच्यावर हा प्रसंग खात्रीनं आला नसता ! गुन्हा केल्या-बद्दलची साक्ष, काकूंचा काळा ठिक्कर पडलेला चेहराच देत आहे !

**सुरेश** : डॉक्टर! झाल्या गोष्टी होऊन गेल्या, पण यावर आतां उपाय?

**विभाकर** : उपाय कांहीं नाहीं! खाण तशी माती आणि समुद्र तसें मोती! प्रभावती आयती मरत आहे, तें एका अर्थी बरंच आहे! मी दुसरें लग्न करीन आणि संसार थाटीन!

**प्रभावती** : नाहीं, नाहीं! मला जगवा! तुम्ही सांगाल तिथं मी येईन आणि तुमच्याबरोबरच संसार करीन! दया करा नी मला जगवा!!

**विभाकर** : पण आतां काय उपयोग? काकासाहेब! मामींनीं केलेल्या खुनामुळं, लौकिकासहित तुमच्या घरादाराची राखरांगोळी उडणार! मी सरकारांत अर्ज करून जगोबाला माफीचा साक्षीदार करणार, अर्थात् त्याची सुटका होऊन तुमचीं सर्व कुलंगडीं चव्हाट्यावर येणार!

**जगोबा** : डॉक्टर! मला साक्षीदार करा! मी सारं खरं खरं सांगेन!

**विभा०** : खटला चालून मामी, काका आणि रमेश यांना फांशीची शिक्षा होईल! प्रभावतीचा प्राण गेल्यावर सरकारी डॉक्टर तिचं प्रेत फाडून विष प्रयोग सिद्ध करतील, आणि अशा रीतीनं आतांपर्यंत केलेल्या तुमच्या पापाचं तुम्हांला भीषण प्रायश्चित्त मिळेल! करायला गेलां एक आणि झालं भलतंच! एकंदरींत परमेश्वर न्यायी खरा! या प्रकरणांत सुधा आणि सुरेश यांना मात्र झळ लागणार नाहीं!—हा निघालों पाहा तुम्हांला कोर्टांत खेंचण्याकरितां!

**काका** : डॉक्टर! पायां पडतों, साष्टांग नमस्कार घालतों; पण आम्हांला अब्रू-निशीं वांचवा!

**भवानी** : जांवईबुवा! पुन्हा आम्ही असं घोर कृत्य करणार नाहीं! तुम्हीच वाटेल तर आमचा प्राण घ्या; पण आम्हांला सरकारच्या ताब्यांत देऊं नका!

**रमेश** : डॉक्टर! माझ्याकडे काय अपराध आहे? तुम्ही सांगाल तसं वागतों, पण मला फांसावरून सोडवा!

**प्रभावती** : मला वांचवा! मला वांचवा! अंगाची आग! तुमच्या अर्ध्यावचनांत मी राहीन!

**सुरेश** : डॉक्टर! पाय धरतों! झालं तें झालं! तुम्ही तरी आमच्या अब्रूवर उठूं नका!

**सुधा** : ही मंडळी माझी हाडवैरी असली, तरी मी यांचे सर्व अपराध पोटांत घालून सांगतें, डॉक्टर, यांच्यावर दया करा!

**विभाकर :** ठीक आहे, जात नाहीं मी कोर्टाकडे ! इतकंच काय, पण मी शोधून काढलेलें " अँटी पॉयझन् " मेडीसीन देऊन प्रभावतीचं विष उतरवीन आणि तिला प्राणदान सुद्धां देईन ; पण मी सांगेन त्या अटी काकांसाहेबांनीं आणि प्रभावतीनं प्रथम मान्य केल्या पाहिजेत !

**काका० :** बोला, बोला ! तुम्हीं सांगाल त्या अटी आम्हांला मान्य आहेत !

**विभाकर :** काकासाहेब ! मामींना घेऊन तुम्ही काशीयात्रेकरितां स्टेशनचा रस्ता धरला पाहिजे ! आणि एक वर्षपर्यंत घरीं येतां कामा नये ! आणि प्रभावतीनं या पावलीं माझ्या बरोबर घरीं आलं पाहिजे !

**भवानी० :** रमेशाचं लगीन व्हायचं आहे......

**विभाकर :** तें सारं सुरेश पाहून घेतील ! एक वर्षानंसुद्धां घरीं येतां कामा नये; कुठेंतरी क्षेत्रांतच वस्ती केली पाहिजे, मात्र सुधाताईनीं आज्ञा केली तर घरीं यायला हरकत नाहीं !

**भवानी० :** जांवईबुवा ! नका हो असल्या भयंकर अटी घालूं !

**प्रभावती :** अग, माझा प्राण जायला लागला आहे आणि या वेळीं त्यांच्याशीं काय हुज्जत घालीत बसली आहेस ? कर, साऱ्या अटी मुकाट्यानं कबूल आणि मला वाचीव !

**भवानी० :** आम्हांला सर्व अटी कबूल आहेत !

**विभाकर :** चला तर आतां ! मुलाकडे काय पाहतां ? त्याच्याकडे मला आणि तुम्हांला कुणालाच, लक्ष देण्याचं कारण नाहीं ! चला, तूर्त खर्चापुरते पैसे घ्या ! ( देतो ) मागाहून मनी ऑर्डर करूं !

**भवानी :** पोरीला बरी झालेली तरी डोळ्यांनीं पाहूंद्या !

**विभाकर :** एक डोस् देतों. तेवढ्यानं तलखी कमी होईल. त्यावरून काय तें समजा. तुम्ही गेल्यावर पूर्ण विष उतरवीन ! ( देतो ; तिला थोडे बरें वाटतें. )

**काका :** बरं तर !–सुरेश ! रमेश येतों. ! संभाळून असा !–सुनबाई ! येतों ! वरचेवर पत्र पाठव. ( सुधा नमस्कार करिते ) प्रभा ! येतों बरं ! सासरीं सुखानं नांद.

**भवानी :** येतों आम्ही ! ( जड पावलांनीं जातात. )

**विभाकर :** प्रभावती, हा घे दुसरा डोस (देतात). पांच मिनिटांत अंगाची तलखी पूर्ण बंद होईल आणि तूं जगशील! चला, मी आल्यासारखं काम झालं! सुरेश ! सुधाताई ! चुकल्यामाकलेल्याची क्षमा करून आम्हांला आतां निरोप द्या बरं ! माझ्या लाडकीसह मी माझ्या घरीं केव्हां एकदां जाईन, असं मला झालं आहे !

**सुधा :** डॉक्टर ! तुमचे उपकार मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं बरं !

**सुरेश :** विभाकर ! दुबळ्यांना अभयदान देणारे तुम्हीच खरे महात्मे !–ताई, संभाळून ये बरं !—

**विभा :** या महात्म्याला-- जगोबाला सोडूं नका ! बरं आहे, येतों आम्ही ! " सर्वे सुखिनः सन्तु ! "

(प्रभावतीसह जातो; सुरेश व सुधा एकमेकांकडे पाहून समाधानाचा सुस्कारा सोडतात, तोंच पडदा पडतो.)

**समाप्त**

# कै. गणेशशास्त्री फाटक यांचीं क्रमशः रंगभूमीवर

× अप्रकाशित ] **आलेलीं नाटकें** [ × अप्रकाशित

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ स्वर्गसाम्राज्य | पौराणिक | तीन अंकी | नाटक | किंमत | १॥ रु. |
| २ क्रांति कौशल्य | ,, | ,, | ,, | ,, | १॥ रु. |
| ×३ श्रीकृष्णदान | ,, | ,, | ,, | ,, | |
| ×४ बालगोपाल | ,, | ,, | ,, | ,, | |
| ५ पंतांची सून | सामाजिक | ,, | ,, | ,, | २ रु. |
| ×६ दिलदौलत | ऐतिहासिक | ,, | ,, | ,, | |
| ७ नानांची माया | सामाजिक | ,, | ,, | ,, | २ रु. |
| ८ माझी जमीन | ,, | ,, | ,, | ,, | १॥ रु. |
| ९ व्याहीविहिणी | ,, | दोन अंकी | नाटिका | ,, | ।॥ रु. |
| ×१० मत्स्येंद्रनाथ | संतपर | तीन अंकी | नाटक | ,, | |
| ×११ स्वर्गसुंदरी | पौराणिक | ,, | ,, | ,, | |
| १२ लाडकी लक्ष्मी | पौराणिक | ,, | ,, | ,, | १॥ रु. |
| १३ डेक्कन क्वीन | सामाजिक | ,, | ,, | ,, | १॥ रु. |
| १४ मोटारवाला | ,, | ,, | ,, | ,, | १॥ रु. |
| १५ पठाणी पाश | ,, | दोन अंकी | नाटिका | ,, | १। रु. |
| १६ सासुरवास | कौटुंबिक | ,, | ,, | ,, | १ रु. |
| ×१७ दिवाळसण | ,, | ,, | ,, | ,, | |
| १८ घरजांवई | ,, | ,, | ,, | ,, | ।॥ रु. |
| ×१९ बाईलवेडा | ,, | ,, | ,, | ,, | |
| ×२० पापी ईश्वर | सामाजिक | एक अंकी | नाटुकलें | ,, | |
| ×२१ वीरशृंगार | पौराणिक | तीन अंकी | नाटक | ,, | |
| ×२२ उदार धर्म | सामाजिक | एक अंकी | नाटुकलें | ,, | |
| ×२३ वीर विजय | पौराणिक | तीन अंकी | नाटक | ,, | |
| ×२४ सौभाग्यवती | सामाजिक | दोन अंकी | नाटिका | ,, | |
| २५ स्टेट कॉंग्रेस | राजकीय | तीन अंकी | नाटक | ,, | १॥ रु. |

पत्तेः-( १ ) **स्वर्गसाम्राज्य पुस्तकालय**, कुरुंदवाड,
( २ ) **बलवन्त पुस्तक भाण्डार**, गिरगांव नाका, मुंबई नं. ४.